—ऐतिहासिक नाटक—

# करीन ती पूर्व

—लेखक—


## भार्गवराम विठ्ठल वरेरकर

कुंजविहारी, हाच मुलाचा बाप, लयाचा लय, संन्याशाचा संसार,
सत्तेचे गुलाम, तुरुंगाच्या दारांत, नवा खेळ, करग्रहण,
परक्यासाठीं, धरणीधर इत्यादि नाटकांचा व
चिमणी, प्रेमाचें प्रेम इत्यादि
कादंबऱ्यांचा कर्ता



द्वितीयावृत्ति

१ सप्टेंबर १९३०

किंमत एक रुपया

प्रकाशकः—
ळवंत विष्णु परचुरे
परचुरे, पुराणिक आणि मंडळी
माधवबाग, मुंबई नं. ४

'करीन ती पूर्व !' या नाटकाच्या
सर्व प्रकारच्या हक्कांसंबंधीं
चौकशी करणें ती
कर्त्याचे पॅटर्नीज्
"मेसर्स रेळे आणि कंपनी,
रोडिमनी मॅन्शनन्स्,
फोर्ट मुंबई"
यांजकडे करावी.

मुद्रकः—द. ग. सावरकर.
श्रद्धानंद मुद्रणालय.
खटाव मकनजीची वाडी,
गिरगांव मुंबई ४

# प्रस्तावना

श्रीशिवाजी महाराजांच्या चरित्रांतील प्रसंगावर नाटक लिहिण्याची फार दिवसांची इच्छा आज तीनशें वर्षांच्या उत्सवानंतर **समर्थ नाटक मंडळीच्या** आग्रहामुळें पुरी होत आहे. नाटक माझ्या व माझ्या विशिष्ट चहात्यांच्या कसोटीला उतरण्याजोगें झालें नाहीं, याची मला पूर्ण जाणीव आहे. कथानकाच्या कालासाठीं जितकें मागें जावें लागलें, तितकीच रचनेच्या पद्धतीसाठींहि माघार घ्यावी लागली आहे. परिस्थितीहि कथासूत्रांतील प्रसंगाचीच निदर्शक आहे असें क्षणभर वाटूं लागतें. त्यामुळें मंडळीच्या सुदैवानें नाटक यशस्वी—ह्मणजे भरपूर पैसे देणारें—झालें तर त्याबद्दल मला यत्किंचितहि अभिमान वाटणार नाहीं. माझ्या आवडी-प्रमाणें ऐतिहासिक नाटक लिहिण्याच्या संधीची मी वाट पहात आहें.

नाटकाची सजावट करतांना ज्याप्रमाणें पोषाख व देखावे यथातथ्य दाखवण्याचा उपक्रम झाला आहे, त्याचप्रमाणें पात्रांची भाषाही शक्य तितकी यथातथ्य लिहिण्याचा प्रयत्न करणें अवश्य आहे. तसें करण्यासाठीं या कथेपुरता योग्य व बिनतक्रार आधार, ह्मणजे समर्थांचा **'दासबोध'**च होय. मराठे पात्रांची भाषा ' दासबोधी ' वळणावर लिहून मुसलमान पात्रांच्या भाषेंत उर्दू फारशी शब्दांचें शक्य तेवढें प्राचुर्य ठेवलें आहे. ऐतिहासिक कथाभाग करड्या ऐतिहासिकाच्या नजरेलाहि दोषास्पद न वाटण्याइतका यथातथ्य राखला आहे. ज्या एकाच ठिकाणीं प्रसंगाला वळण दिलें आहें, तेथेंच तसें करण्याचीं कारणें दिलीं आहेत, तीं कोणाही सहृदय ऐतिहासिकाला पटतील अशींच आहेत. ज्या वेळीं चेहेऱ्याच्या सारखेपणाचा प्रश्न येतो त्या वेळीं दोन विलग चेहेऱ्याचीं पात्रें समोरासमोर आणून साम्यावर इमारत उभारित गेल्यानें ' प्रेमशोधन ' सारखें अव्वल दर्जाचें नाटक आज रंगभूमीवर राहिलें नाहीं, या गोष्टीचा धडा घेऊन अशा दोन पात्रांचीं कामें एकाच व्यक्तीला करतां यावीं, अशीच या नाटकांत योजना केली आहे. या कथाभागाची जुळणी करण्यास लागणारी साधन-सामग्री दाखवून देण्यास प्रसिद्ध ऐतिहासिक श्री. **कृष्णराव केळुसकर** हे मला मार्गदर्शक झाले व नाटक लिहित असतां माझे नाटककार मित्र श्री. **विष्णुपंत औंधकर** यांनीं मला परोपरीनें मदत केली हें येथें नमूद करून ठेवणें अवश्य आहे.

बेळगांव,
गोंधळी गल्ली, ता. २०-८-१९२७

सर्वांचा सेवक
**भार्गवराम विठ्ठल वरेरकर**

# —दुसरी आवृत्ति—

महाराष्ट्रांतील प्रसिद्ध नाटककार श्री. भार्गवराम विठ्ठल वरेरकर यांच्या नाटकाची ही दुसरी आवृत्ति त्यांच्याच परवानगीनें आम्हीं छापून प्रसिद्ध करीत आहों. पूर्वीच्या आवृत्तींतील मुद्रण दोष दुरुस्त करण्यापलीकडे या आवृत्तींत कोणत्याही प्रकारचा फरक केलेला नाहीं. **समर्थ नाटक मंडळींतील नटांनीं** नवीन फोटो या आवृत्तीसाठीं दिले व पुस्तक सुंदर करण्याच्या कामीं आम्हांस सहाय्य केलें याबद्दल आम्हीं त्या नट वर्गाचे आभारी आहों. पुस्तक सुबक व शुद्ध रीतीनें छापण्याचे कामीं श्रद्धानंद मुद्रणालयाचे चालक आमचे मित्र श्री. **दत्तोपंत सावरकर** यांस धन्यवाद देणें आमचें कर्तव्यच आहे. प्रथमावृत्तीप्रमाणेंच याहि आवृत्तीस वाचकवर्गानें आश्रय द्यावा अशी नम्र प्रार्थना आहे.

माधवबाग, मुंबई. } **परचुरे, पुराणिक आणि मंडळी,**
ता. १।९।३०. } बुकसेलर्स व पब्लिशर्स.

# करीन ती पूर्व

## अंक १ ला

### प्रवेश १ ला

[ **स्थळ**—अली आदिलशहाचा दरबार ]

**शहा**—शिवाजी! शिवाजी!! शिवाजी!!! जिकडं पहावं तिकडे शिवाजीचा जय! विजापूरच्या सलतनतींत असा कोणीच का समशेरजंग नाहीं, कीं जो या शिवाजीचा नक्षा उतरवील? जी जी तरकीब करावी ती ती आमच्याच अंगाशीं येते; जो जो सरदार पाठवावा तो तो कच खाऊन माघारा फिरतो. मूठभर मावळ्यांशीं झुंजतांना आमचं अस्मानभर सैन्य नेस्तनाबूत होतं. अफझुलखानासारखा वीर उभा चिरला जातो. रुस्तुम जमानसारखा सेनाखासखेल कृष्णापार पळून येतो. असा हा शिवाजी आहे तरी कोण?

**काळुर्जी**—दुस्मानाची तारीफ खाविंदच करीत आहेत. आम्हीं गरिबांनीं काय बोलावं? शिवाजी कोण आहे हें अलम दुनियेला माहीत आहे; पण तो कसा आहे हें मात्र बहुतेकांनीं पाहिलं नाहीं. कुणी म्हणतात तो ठेंगणा आहे, तर कुणी म्हणतात ताडभर उंच आहे. कुणी म्हणतात तो फिरंग्यागत गोरा आहे, तर कुणी शियावाणी काळारोम असल्याचा डोळ्याचा दाखला देतात. शिवाजीच्या कित्येक मावळ्यांना देखील शिवाजीची ओळख नाहीं म्हणून म्हणतात; मग आम्हां दुष्मानांना ती कशी सांगतां येणार?

**शहा**—शिवाजीची ओळख कुणी विचारली? आम्हीं म्हणतों हा शिवाजी दुनियेपार कसा होणार? असा कोण शेराचा बच्चा त्याच्यावर चाल करून जाणार? आधींच दिल्लीच्या औरंगजेबानें कित्येक दिवस आमच्यावर मोर्चेबंदी केली होती. दोन वर्षांपूर्वीं तो दख्खन सोडून गेला तेव्हां आमचा दिल आराम झाला. शिवाजीचा आतां समाचार घेऊं म्हणून हस्तीबळाचा अफझुलखान

पाठविला, त्याची तशी गत झाली. रुस्तुमजमानानं चंग बांधला आणि आमच्या आशेचा भंग केला. रुस्तुमजमान कृष्णापार होतांच शिवाजीनं विजापुरालगत मोर्चे लावले आणि आतां त्याचा समाचार घेऊं म्हणून आम्ही विचार करणार तोंच अस्मानच्या बिजलीसारखा देखतांदेखत राजगडीं जाऊन-सुद्धां पोंचला. कुठून आला–कुणीकडे गेला याची दादसुद्धां लागली नाहीं. अर्धी समशेर म्यानाबाहेर काढून आम्हीं पुढं सरसावणार तोंच परत समशेर म्यान करून आम्ही अल्लाचं नांव घेत आराम बसलों. अशी पुंडाई चालू राहील तर आम्ही कशाला आणि आमची ही विजापूरची आदिलशाही तरी कशाला ? तिकडे दिल्लीचा बादशहा डोळे वटारतो, तर इकडे हा डोंगरचा उंदीर आमच्या तख्ताला सुरुंग लावतो आहे. आमचे जंगबहादुर नादान झाले तर आम्हीं ही बादशाही चालवावी कुणाच्या बळावर ?

**फाजल**—गरीबपरवर ! बंद्याची बात एकवार कानी घ्यावी. आमच्या वालिदांनीं–अफझुलखानांनी काय केलं तें खावंदांच्या दप्तरीं सुपुर्द आहे. तुळजापूर पंढरपूरचीं देवस्थानं बेचिराख केलीं. औंधच्या यमाईची खोड काढली आणि पालीच्या खंडोबाची खांडोळी केली. नाकांत वेसण घालून शिवाजीला पायाशीं आणला; पण सैतानानं दगा दिला. खावंदांच्या चाकरींत आमचे वालीद कामास आले. मावळ्यांची जात बेहराम; पण खंडोजी खोपड्या-सारखा एक निमकहलाल धांवून आला. त्यानंच आम्हांला कृष्णापार केलं म्हणून आज खावंदांचे पाय आम्हांला दिसले. खोपड्याची गर्दन शिवाजीनं छाटली; पण आमची खात्री आहे, कीं आम्ही फिरून जाऊं तर शेंकडो खोपडे खावंदाच्या खिजमतींत रुजू होतील. थैलीचा दोर आंवळला नाहीं तर मावळ-बरचा आपला चांद मावळणार नाहीं. खावंदांचा दिल दिलदार आहे, खाविंद दिलावर आहेत. खाविंदांनीं हात उचलला, तर पसरलेले हात पुढं सरसावतील. दाम हातीं पडतांच कामासाठीं उपसलेल्या आमच्या समशेरी खावंदांचं नांव सलामत करतील.

**काळूजी**—सरदार फाजलमहंमदभाईचं म्हणणं यथार्थ आहे. माझीहि तशीच खातरजमा आहे. खाविंदांच्या पायांच्या प्रतापानं अजूनहि आम्ही शिवाजीचा समाचार घेऊं. आमचे सरकार लखम सावंत सरदेसाई आजपावेतों

विजापूर दरबारशी फटकून वागले नाहीत. विजापूर दरबारच्या इभ्रतीसाठीं त्यांनी शिवाजीशीं आजवर कित्येक वेळां दोन हात केले आहेत.

**शहा**—पण फिरून वाडकरांनीं शिवाजीशी तह केलाच की नाही ?

**काळुजी**—केला. गोष्ट खरी आहे. पण त्याचं कारण खाविंदांच्या ध्यानीं कुणी आणून दिलं नाही. गनिमाशी गनिमी कावाच करावा लागतो. आमची इच्छा निराळी होती; पण पितांबर शेणव्यानं पाजीपणा केला. भेद काढण्यासाठी त्याला वकील म्हणून पाठविला; पण शिवाजीच्या करामतीनं तो हुरळून गेला. गनिमांच्या भुलथापांना भाळून त्यानं भलत्याच अटींवर तह केला आणि शिवाजीचं घर भरून खाविंदांशी बेमान झाला. खावंदांची मोहबत राखावी ही आमच्या सरकारांची इच्छा. म्हणून पितांबर शेणव्याचा मूर्खपणा दुरुस्त करण्यासाठीं खाविंदांच्या पायांपाशी मला सरकारनीच पाठविलं आहे.

**शहा**—सरदेसाई मराठे आहेत, भोसल्यांचे भाई आहेत. मराठ्यांचं राज्य उभारण्याचा शिवाजीचा मनसुबा त्यांनाही पसंत पडला नसेल कशावरून ?

**काळुजी**—प्रत्यक्ष शिवाजीचा बाप शहाजी तरी खावंदांच्याच छत्राखालीं आहेना ? बापाला बाप न म्हणणारा शिवाजी सरदेसायांची जात कितीशी ओळखणार ? उलट पक्षीं पाहिलं तर पितांबर शेणवी काय शिवाजीच्या जातीचा होता ? पण तो त्याला फितूर झालाच कीं नाहीं ? कसली जात आणि कसले जातभाई ? खाविंदांच्या मोहबतीची ज्यांना तोशीस आहे, त्यांना जातकुळीची पर्वा बाळगून भागणार नाहीं.

**फाजल**—काळुजी जाधवांचं ह्मणणं बिलकूल खरं आहे. मावळ कोंकणचा मुलूख विजापूरच्या आदिलशाहीत जमा झाला तो काय एकट्या मुसलमानांच्या करामतीवर ? मराठ्यांशीं दिलजमाई करूनच आह्मीं ही सलतनत वसवली आणि आजवर कायम राखली. शिवाजीसारखा एखादा भुरटा काफीर चार दिवस चतुराई दाखवूं लागला ह्मणून विजापूरची आदिलशाही कांहीं कोसळून पडत नाहीं. खाविंदांनी असा रंज धरण्याचं कारण नाहीं !

**शहा**—मग कृष्णापार पडून येण्याऐवजीं आपल्या वालिदांची फौज घेऊन तुह्मींच कां शिवाजीवर तुटून पडला नाहीं ?

**फाजल**—फितूर !—खाविंद फितूर ! ! शिवाजीनं आमच्या फौजेंत फितूर केला.

**शहा**—मग तुह्मी शिवाजीच्या फौजेंत फितूर कां केला नाहीं ?

**फाजल**—तेवढा वख्त नव्हता—तेवढा पैसाहि नव्हता. खाविंदांच्याकडे आतां आमची तीच अर्जी आहे. फितूर करूनच आह्मीं शिवाजीला खाविंदांच्या पायांशीं आणणार. एका हातानं फितुरी आणि दुसऱ्या हातानं कत्तल याच इश्मेनं आह्मीं आतां शिवाजीशीं सामना देणार. एवढ्याचसाठीं वाडकरांचे हे काळुजी जाधव खाविंदांच्या पायांपाशीं आले आहेत.

**शहा**—असे कोणीहि आले तरी त्यांची काय खातर ? खानेअज्जम अफझुलखानासारख्या बेगुमान मर्दाचा जिथं खुर्दा उडाला, तिथं तुमच्या सारख्यांचा काय पाड ?

**फाजल**—मग त्यांचा बदला कोण घेणार ? माझ्या बहिश्तीच्या वालिदांची रूह कशी परेशान होणार ?

**शहा**—तेंच तर आम्हांला ठीक करवत नाहीं. आहे—एक आदमी आहे. अफझुलखानांचीच तरकीब चालवून शिवाजीचा कलेजा छाटनेवाला बेफाम मर्द आतां एक तेवढाच राहिला आहे.

**फाजल**—असा कोण जवानमर्द ?

**शहा**—कर्नूलचा शिद्दी जौहर. जौहर जंगबहादूर आहे—मर्द आहे; पण बेमान आहे.

**फाजल**—इमानदारी गेली. आतां बेमानाची बेइमानी इमानाचं इनाम कसं मिळवते तें पहायचा वख्त आला आहे. पण खाविंद, तो बेमान कसा ?

**शहा**—कर्नूलचे सरदार आमचे दोस्त मलिक रयहान यांच्या घरचा तो खरीद गुलाम ! धन्याच्या मौतीमागे त्यांच्या वारसाला बेगुमान धुडकावून तो अव्वल बदमाष आमच्या फर्मानाविना कर्नूलचा मालिक होऊन बसला.

**फाजल**—हें राजकारण आहे खाविंद. मलिक रयहानची पोरंच पागल निघालीं त्याला जौहरनं काय करावं ? अशा नादान पोरांच्या हातांत कारभार देऊन रयतेला काय बेदिल बनवावं ? मलिकच्या पोरांवर रयतेचा भरंवसा नव्हता. शिद्दी जौहर गुलाम आहे; पण तो इमानी गुलाम आहे.

धन्याच्या मागं रयत बेकार होऊं नये म्हणून रयतेच्याच सल्ल्यानं त्यानं कर्नूलचा कारभार हातीं घेतला. यांत बेइमानी कोणती झाली, खाविंद ?

**शहा**—असं असेल तर आम्ही त्याची तकसीर माफ करूं. पण याचा पुरावा ?

**फाजल**—बंद्यावर खावंदांचा भरंवसा असेल, तर दुसरा पुरावा फजूल आहे. खाविंदांच्या या बंद्यानं या हकिगतीची खात्री करून घेतली आहे. खाविंदांची मर्जी होईल तर शिद्दी जौहरला हजर करीन म्हणतो.

**शहा**—शिद्दी जौहर या विजापुरांत ?

**फाजल**—होय खाविंद. आपली बेगुन्हागारी शाबित करण्यासाठी खावंदांच्या मर्जीची राह चाहतो आहे.

**शहा**—या अल्ला ! खुदातालाची खैर आहे. जा !–त्याला घेऊन या. [ फाजल जातो ] आम्ही त्याचं नांव घ्यावं आणि त्यानं आधींच हजर असावं ही अल्लाहोतालाची खैर नाही असं कोण म्हणेल ? [ फाजल व रुमालानं हात बांधलेला शिद्दी जौहर प्रवेश करतात. ]

**जौहर**—[ गुडघे टेकून ] कुसूर माफ, कुसूर माफ, खाविंद कुसूर माफ !

**शहा**—फाजल साहेब ! सोडा त्यांचे हात. शिद्दी जौहराचा गुन्हा आम्ही रहीम केला आहे.

**जौहर**—गरीब परवर ! बंदा लाचार आहे. जौहर धन्याशी निमकहलाल राहिला; पण दुष्मानांनी त्याला निमकहराम ठरवला. कर्नूलच्या सुभ्याची कर्तबगारी त्याच्या हल्लींच्या अवलादींत आहे की नाही हें खाविंदांच्यापाशी कोणी पेष करावं ? या गुलामाचं कडवं इमान अक्कलमंद सरदारांना कसं कळावं ? खाविंद इकडे विजापुरांत तर आम्ही बंदे दूर कर्नाटकांत. जाग्यावरच्या बंद्याला काय करावं लागतं हें तख्तावरच्या खाविंदांना कोण समजावून देणार ? इमानदारीची इज्जत गेली, वफादारीची कुणी कदर केली नाहीं आणि धन्यासाठीं हातावर मुंडी घेऊन सुभ्याची अब्रु राखणारा हा गुलाम गुन्हेगार ठरला. पण खाविंद दिलदार–गुन्हा माफ केला, अब्रु साफ झाली.

**शहा**—आमचे दिलेजान सरदार फाजलमहंमद यांनीं तुमचा अर्ज सादर केला. मंजूर झाला. इतराजी रहीम केली; पण त्याची कदर चाकरीनं झाली

पाहिजे. शिवाजीची बात तुम्ही जाणतां. शिवाजी सैतान आहे, काफीर आहे, बादशाहीचा बडा दुष्मन आहे. आमचे जिगरदोस्त फाजल महंमदसाहेब यांचे वालिद अलिशान खानेआज्जम अफझुलखान, त्याला गिरफदार करतांना कसे कामास आले ते तुम्हांला माहीत आहेच. करवीर सुभेतहत त्यानं सर्व मुलुख काबीज केला आहे. आमच्या रयतेचा जो मुकासा होता, तो तसाच कायम ठेवून त्यानं रयतहि काबीज केली आहे. आज पन्नास किल्ल्यांचा तो मालिक आहे. त्याची फौज काय आहे हें कुणालाहि दख्खल नाही. पन्नास आदमी आहेत म्हणावं तर पांचशें दिसतात; पांचशेंचे पांच हजार केव्हां होतात हें कळणं मुष्कील जातं. अशा सैतानाशी झुंज खेळायची आहे हे ध्यानांत ठेवा.

**जौहर**—गुलाम चाकरींत हजर झाला तो आंधळ्या डोळ्यानं आला नाहीं. तहत करवीर ते खेळण्यापासून अरबीसमुद्रापावेतो, बंद्यानं खबर काढली आहे. खिंड, रान, जंगल, किल्ले पक्के हेरून ठेवले आहेत. कोणत्या जनावराला कुठं जखम करावी हें या बारगिरीला पक्कं अवगत आहे. शेराची शिकार करायची आहे हें ध्यानांत घेऊन खाविंदांनी इतमामाची तजवीज करावी असा बंद्याचा अर्ज आहे.

[ हिरोजीला काढण्यांनी बांधून शिपाई व त्यांचा नाईक प्रवेश करितात. ]

**शहा**—काय आहे ? क्या है ?

**जमादार**—गरीबपरवर ! हा एक बदमाष मराठा लपत छपत खाविंदांच्या वाड्यांत टेहळणी करीत असतांना पकडला आहे. याची झडती घेतां हा लखोटा सांपडला. तो खावंद चरणी सुपुर्द करतो.

**फाजल**—कोण तूं ?

**हिरोजी**—मराठा.

**फाजल**—तुझं नांव ?

**हिरोजी**—मराठा.

**फाजल**—नांवहि मराठा ? जात ?

**हिरोजी**—मराठा.

**फाजल**—धंदा ?

हिरोजी—मराठेशाहीचा.

फाजल—गांव ?

हिरोजी—महाराष्ट्र.

फाजल—महाराष्ट्राचा कोणता परगणा ?

हिरोजी—महाराष्ट्राचा प्रत्येक परगणा.

शहा—बदमाष् ! सीधा जबाब दे. नाहीतर तुझ्या आंगाचे सांडसानं लचके तोडले जातील. बोल ! बिगरपरवाना या वाड्यांत कां शिरलास ? कसा शिरलास ?

हिरोजी—हा अस्सा. या शिपायांनी माझ्या मुसक्या बांधून मला इथं आणलं.

फाजल—हा लखोटा कुणाचा

हिरोजी—मला सांगतां येत नाही.

जमादार—नाही खाविंद, हा झूट बात करतो आहे. लखोटा याच्याचपाशीं होता. आम्हांला तो झडतींत सांपडला. त्यानं खूप दंगामस्ती केली; पण तो एकटा आणि आम्हीं पंचवीसजण असल्यामुळं त्याला सहज गिरफदार केला.

शहा—काळुजी जाधव ! तुम्हीं याला ओळखतां ?

काळुजी—नाही खाविंद.

हिरोजी—( दांतओठ खाऊन ) खाविंद अं ?

काळुजी—पण हा शिवाजीचा मराठा आहे यांत शंका नाही.

शहा—क्यों बे बदमाष ! तेढी बात सोडून तूं सीधा सीधा जबाब देणार की नाहीं ?

हिरोजी—एकदां जबाब दिला आहे. मी बोललो त्यापेक्षां एक अक्षरसुद्धां अधिक बोलणार नाहीं.

शहा—जाधव, हा लखोटा कुणाला लिहिला आहे ? काय मजकूर आहे त्यांत ?

काळुजी—[ वाचून पाहून ] याच्यावर कुणाचंहि नांव नाही. यांतील मजकूर मात्र विलक्षण आहे. विजापुरांतील कोणा हेराला शिवाजीचा असा

निरोप आहे कीं, कर्नूलचा शिद्दी जौहर खाविंदांची माफी मिळविण्यासाठीं जातो आहे–शिवाजीवर चाल करून खाविंदांची मोहबत मिळविण्याचा त्याचा हेतू आहे. त्याची बातमी काढून पत्र घेऊन येणाऱ्या हेराला ती कळवण्याचा त्यांत हुकूम आहे.

**शाहा**—आमच्याहि पूर्वी शिवाजीला ही बातमी मिळते ! जाधव, त्या हेराचा कांहींच पत्ता पत्रांत नाही ?

**काळुजी**—नाहीं खाविंद !

**शाहा**—बस्स ! एक ठरलं की, हा लखोटा कुणा मराठ्यासाठीं आहे. अब बदमाष, बऱ्या बातेनं बोल; हा कुणासाठीं आहे ?

**हिरोजी**—मी आतां एक शब्द सुद्धां बोलणार नाहीं. एकदां तेच दहादां. पुन्हां जबाब मिळणार नाही.

**शाहा**—न्या ! या बदमाषाला एकदम इथून न्या आणि जबाब देईपर्यंत तापलेल्या सांडसानं याचे लचके तोडा. ले जाव–[ शिपाई त्याला घेऊन जातात. ] काय ही अंदाधुंदी ! शिवाजीच्या हेरांनीं माझ्या तख्तापर्यंत रिघाव करावा आणि त्याची दादहि कुणाला लागूं नये ?

**काळुजी**—म्हणूनच म्हणतों. गरीब परवर, आतां लढाईखेरीज दुसरा इलाज नाहीं.

**शाहा**—ठीक आहे. शिद्दी जौहर, किती फौज दिली म्हणजे तुमची शिबंदी होईल ?

**जौहर**—तूर्त दहा हजार स्वार आणि चौदा हजार प्यादा बस्स आहे. खानसाहेब फाजल महंमद माझ्यासाथ येतीलच आणि हे बाडचे जाधव—

**काळुजी**—खाविंदांच्या चरणीं एक विनंतिअर्ज आहे. या शूर मर्दांच्या खांद्याला खांदा भिडवून लढण्यांत मला भूषणच आहे. पण त्यापेक्षां शिवाजीच्या गोटांत शिरून त्याच्या बातम्या मोहिमेवर पोचविण्यांत तख्ताची सेवा मोठी होणार आहे. या लखोट्याच्या मदतीनं शिवाजीच्या अंतरंगांत शिरकाव करणं मला सुलभ होईल—

**शाहा**—ठीक आहे. तसंच करा.

**काळुजी**—आणखी एक अर्ज आहे. आतां पकडलेल्या ह्या हेराला बिनशर्त सोडून द्यावा—

**फाजल**—तोबा ! तोबा ! ! ही काय बात आहे !

**शहा**—बोला ! पुढं बोला !

**काळुजी**—याला सोडून दिल्यावर हा शिवाजीकडे परत जाईल. या लखांट्याच्या मदतीनं मी तिथं काय तरकीब रचणार, हे खुद्द खाविंदांनाच पेष करणं बरं. हा लखोटाहि माझ्याकडे रहावा.

**शहा**—ठीक आहे. त्या हेराला सोडून द्या. शिद्दी जौहर आजपासून दरबारतर्फे तुम्हांला ' सलावत जंग ' हा किताब बहाल करण्यांत येत आहे. या मोहिमेंत फत्ते मिळवा. तुमची तकसीर आम्ही खुषीनं माफ करूं. पण जर का फटका घेऊन परत आलांत, तर याद राखा—गर्दन मारली जाईल.

**जौहर**—बेशक ! बंदा राजी आहे. तक्ताला हात लावून कसम खातों कीं, खाविंदांच्या चाकरीखातर जान कुरबान करीन.

[ पडदा पडतो ]

---

## प्रवेश २ रा

[ करवीरांतील एक रस्ता. गजरा व पुतळा प्रवेश करतात. ]

**गजरा**—वन्सं, वन्सं, थांबा—जरा थांबा. एवढी घाई कसली आहे

**पुतळा**—वहिनी ! तुझ्यासारखं रेंगाळत चालून पल्ला गांठायचा नाहीं. अग, पतीच्या दर्शनास जायला गरुडाची भरारी मारावी म्हणतात. अशी मुंगीच्या पावलांनी कुणी चालूं लागली कीं, तिचा पती घरीं आहे म्हणून हटकून ओळखावं.

**गजरा**—मनाच्या भरारीसाठीं पायाची पाउलवाट कांहीं दौडीला लावायला नको. मनाचं माप हातीं असलं कीं, पावलाचं प्रमाण उमाप ठरतं. पतीची मूर्ति हृदयांत असली कीं, पावलाच्या उचलीला गरुड आणि मुंगी सारखीच.

**पुतळा**—ही शाहिरी नको बाई मला. आमचं आपलं साधंसिधं गाणं. आज माझे पतिराज विजापुराहून येणार. ठरला दिवस कधीं चुकवायाचा नाहीं, असा आहे तिकडचा स्वभाव. अगदी सारीं कामं कशीं वेळच्या वेळीं व्हायची. सरदेसायांचा त्यामुळंच ना एवढा विश्वास ? केवढ्या

मोठया कामगिरीवर जाणं झालं आहे, तुला कसं कळायचं तें ! शिपाई गड्यांची कारभारीण तूं. पाडव्या दसऱ्याला गांठीभेटीची तुमची संवय. मी दरबारी मुत्सद्यांची राणी. आमच्या ताटातुटीचा प्रसंग पाडव्या दसऱ्याला, ह्मणून मनाला अशी आढी पडते आणि जरा कुठं दृष्टिआड होणं झालं कीं, केव्हां भेट होईल ह्मणून मन हुंदके देऊं लागतं. ताटातुटनंतर जेव्हां भेटीची वेळा येते, तेव्हां काय वाटतं तें कळायला घरच्या घरधन्याची बाईल व्हावं लागतं.

**गजरा**—मुत्सद्दी !—कसले मेले मुत्सद्दी, घरचे घरकोंबडे—बाजारच्या तुरीसाठीं आपसांत झगडत असतात झालं. शिपायाचा बाणाच न्यारा. त्याची गोडी तुला कळायची नाहीं. चंदनाच्या उटीसाठीं हात झिजवायला नकोत कांहीं. आठाकाळीं बारामार्शी पतीराज घरीं येतात, तेव्हांच दुष्मानाच्या रक्ताची उटी माखून येतात. पंचारतीच्या प्रकाशांत रक्ताचा टिळा मस्तकीं न्याहाळला कीं, सातां स्वर्गांची भेट झाल्यासारखं वाटतं.

**पुतळा**—खाटकाच्या बायकोला देखील असंच वाटतं. मला नको सांगं शिपायाचा तोरा. दारींचा कुत्रा आणि बारीचा बारगीर दोघेहि सारखेच. छू: झटलं कीं धांवायचं, चाव झटलं कीं चावायचं आणि मागं फिरतांच शेंपूट घोळवीत धन्याचे पाय चाटायचे.

**गजरा**—शब्द सांडणाऱ्या मुत्सद्यांना देहाचें रक्त सांडणाऱ्या शिपायांबद्दल जर असंच वाटत असेल, तर मी ह्मणतें, धन्य या मुत्सद्यांची ! आमचे शिवाजीमहाराज जसे मुत्सद्दी आहेत, तसेच ते शिपाईगडीहि आहेत. दोघांनाहि ते सारखेच लेखतात आणि दोघांनाही ते सारखेच बघतात.

**पुतळा**—मला ठाऊक आहे आणि ह्मणूनच मी वाडकरांच्या घरची असतांहि त्यांना एवढा मान देतें. जर कीं नाहीं ते नुसते शिपाईच असते, तर त्याचं नांवसुद्धां घेतलं नसतं. पण मुत्सद्दीही आहेत ह्मणूनच ना त्यांनी वाडकरांनासुद्धां चकवलं. सदान्‌कदां मी दादाला सांगत असतें, कीं बाबा, मुत्सद्दी हो ! पण त्याला आपली ही हडेलहप्पीची आवड. त्यांतून मी कहीण. माझ्या शब्दाचं वजन कसं पडावं ? तुलाहि त्याचं कांहींच वाटत नाही मग मी नुसतं बोलन काय उपयोग ?

**गजरा**—शिपाई हो म्हणून शिपाई होतां येत नाही; तसंच मुत्सद्दी हो म्हटल्यानं कांही मुत्सद्दी होतां येत नाही. दैवाची रेषा हवी, अंगीचा पेशा हवा, तशीच देवाची देणगीहि असावी लागते.

**पुतळा**—तूं म्हण हवं तर तसं. मला कांही तें पटायचं नाही. जो पेशा माणसानं उचलला तोच त्याच्या अंगी बाणतो. हवी कशाला ही वाटाघाट? कुणाच्या सांगण्यानं काय हे नवरे ऐकायचे आहेत? मी म्हणत असतें राजकारणांत माझी सल्ला घ्या; पण कोण ऐकतंय माझं! हंसतेस काय? अग ही पुतळा तुला अगदी ही वाटते? येऊं द्या वेळ; की दाखवीन माझी मुत्सद्देगिरी. आतां मीं आपलं ठरवलंच आहे कीं, इकडनं ऐकायचं नाहीं तेव्हां स्वतःच कांहींतरी अचाट घेरा घालून दाखवायचा.

**गजरा**—काय अचाट घेरा दाखवणार आहेस तो मी पाहीन. पण तुला आतां मी एक गंमत दाखवतें. समोर पहा—

**पुतळा**—अगबाई! स्वारी! [ काळुजी येतो ] अगदी ठरल्या वेळीं यायचं. पाहिलंस वहिनी, मीं तुला आधींच सांगत होतें फिरंग्यांचा गोळीबार चुकेल; पण इकडचा नेम टळायचा नाहीं.

**काळुजी**—आम्हांला जरा बोलूं द्याल की नाहीं? या गजराबाई काय म्हणतील? त्यांना वाटायचं कीं, हे वाडकर अगदींच बेशिस्त. आधींच तुम्हीं घाटावरचे लोक आम्हां कोंकणी माणसांना नांवं ठेवण्यासाठी टपून बसलेले. एवढं थोडं कारण मिळालं की, त्याच्यावरच इमारत चढायची.

**गजरा**—कसला घाट आणि कसलं कोंकण? मराठा तेवढा इथून तिथून सारखाच. कायमची मुलूखगिरी लागली आहे आम्हां मराठ्यांच्या दैवाला. स्वराज्याचं नांव महाराजांनीं उच्चारलं, तेव्हांच मराठ्याला गांव पारखा झाला. जिथं सर्याचं पाऊल पडेल, तिथं आमचं स्वराज्य आणि जिथं आमचं स्वराज्य तेंच आमचं माहेरघर.

**काळुजी**—ऐकलंत! हे शिवाजी राजांच्या मुलखांतलं भाषण, सावंतांच्या वाडींत ऐकायला मिळायचं नाहीं म्हटलं.

**पुतळा**—एवढं हिणवायला नको कांहीं. पण मुत्सद्यांनीं फार बोलूं नये. मेल्या शिपाई लोकांची भारीच बडबड. मुलूखगिरीच्या गोष्टी चालल्या आहेत; पण करवीराबाहेर पाऊल पडलं असेल तर शपथ.

**गजरा**—मीच कुठं कशाला जायला हवं ! अग घरच्या मुलूखगिरीचा वांटा मिळतोच आहे आह्मां बायकांना. पण आतां घरी चलायचं ना ?

**पुतळा**—हो–वहिनींनं आज मुद्दाम आंबाड्याची भाजी तोडून ठेवली आहे. लसूण तेलाची फोडणी आवडते ना इकडे ?

**गजरा**— ह्मटलं कोकणांत मिळत नाहीं आणि भाऊजींना आवडते तेव्हां—

**काळुजी**—ती माझी खात्रीच होती. अगदी आठवणीनंच पाणी सुटत होतं तोंडाला. विजापुरांत गेलं, की केव्हां इकडे आपल्या मुलखांत येईन असं वाटतं. सारे सोपस्कार होतात; पण बुरख्यांतून. मराठयांच्या घरी देखील बुरखा. आपल्या या खेळणा प्रांताच्या बायकासुद्धां मोठया खेळण्या. शिवाजी महाराजांच्या कृपेनें परक्याची भीति गेली, बुरख्याची रीती गेली. विजापूरचे मुसलमान बिजेच्या चंद्रासाठीं आकाशाकडे पहात असतात; पण या करवीरांत पूर्णचंद्राचं दर्शन नजरसमोर केव्हांहि घडतं.

**पुतळा**—ऐकलंस, वहिनी ! ही शाहिरी सुरू झाली. एकदां ही शाहिरी सुरू झाली कीं तुला आणि मला बोलायला कांहीच शिल्लक राहायचं नाहीं.

**गजरा**—ही पुरुषांची बोली—बायकांना कां हार जायची आहे ? त्यांतनं मुत्सद्दी माणसं. आमच्यासारख्या शिपाईगडयाघरचे बोल ह्मणजे लढाईचे ढोल. मुत्सद्यांची भाषा ह्मणजे फुललेला फुलवरा. आह्मीं आपलं पहायचं, ऐकायचं आणि स्वस्थ बसायचं.

**पुतळा**—हें पहा वहिनी, तुझा स्वभावच अगदीं थंड. अगदीं पंचगंगेच्या डोहाच्या पाण्यासारखा, खळ नाहीं कीं खळबळ नाहीं. वहायचा पण वाजायचा नाहीं. ह्मणूनच दादाचं आणि तुझं एवढं जमलं आहे. नाहींतर आमच्या या करवीरच्या कुटुंबांत सदान्‌कदा आपलीं भांडणं सुरू असायची. बाजार नसला तरी बजबजपुरी सारखी चाललेली.

**काळुजी**—आतां वाटेंतच किती बोलत राहणार ? आह्मांला तर अगदीं कडकडून भूक लागली आहे. तोंडच्या बोलांनीं कांहीं अन्नाचा तोल मिळत नाहीं बरं, हिरोजी नाईक आहेत ना घरींच ?

**गजरा**—कामगिरीवर जाणं झालं आहे. केव्हां यायचं कांहीं सांगितलं नाहीं. आमचं हें शिपायाचं शिलंगण. दसऱ्याची वाट पहावी, तों दिवाळी उजाडून जाते.

**काळुजी**—हे असं पाहिलं, कीं शिपाईगिरी पत्करली नाही याचा आनंद वाटतो. घरची घरधनीण तरी सुखी असते.

**पुतळा**—कसलं सुख ?—ही विजापूरची कामगिरी करावी लागलीच कीं नाही ?

**काळुजी**—म्हणून तर तुला माहेरीं यायला मिळालं.

**गजरा**—सासुरवास असला तर माहेरवासाचा मोह सुटायचा. मला नाही वाटत कधीं माहेरीं जावं असं. लढाईवर जाणं झालं, कीं वाटेकडे डोळे लावून बसावं आणि ग्रहण सुटतांच जसा चंद्र चमकतो तसं माझ्या शिपाईगड्याचं दर्शन झालं, कीं अगबाई !—

**हिरोजी**—[ प्रवेश करून ] कोण काळुजीच हा ! पण दरबारांत पातसहाला जमिनीपर्यंत लवून मुजरा करणारा हा काळुजी माझ्या आधीं इथं कसा आला ?—अरे ए हरामखोर !

**दोघी**—कोण हरामखोर ?

**हिरोजी**—हा-हा-हरामखोर ! देशद्रोही, कुलघातकी, गळेकापू मांग, बेरड—

**गजरा**—असं काय बोलायचं ते ? भाऊजी ना ते ?

**काळुजी**—हिरोजी नाईक, काय बोलतां हें ?

**हिरोजी**—नुसता बोलतांच आहे हे भाग्य समज. हाती समशेर असती तर गर्दन छाटली असती इथल्या इथं.

**पुतळा**—दादा !-दादा !-तुला वेड तर लागलं नाही ?

**हिरोजी**—अजून कसं वेड लागलं नाही याचंच नवल वाटतं. असं वाटतं कीं मुर्गीसारखी मुंडी मुरगळून उकिरड्यावर फेकून द्यावं याला—हात कसे शिवशिवताहेत—पण पुतळा तुझ्याकडे पाहिलं म्हणजे हात लुले पडतात. मराठ्यांच्या अवलादीत असले सैतान निर्माण झालेले पाहिले, कीं मायभवानीच्या कृपेची शंका येते.

**गजरा**—असं काय बोलावं तें ? काय झाला त्यांचा असा अपराध ?

**हिरोजी**—विजापूरच्या दरबारांत मराठ्यांची मुंडी तख्यावरच्या बोकडापुढें लवलेली पाहिली, कीं जातीच्या मराठ्याला काय वाटतं तें तुम्हां बायकांना कळणार नाही. हा बेरड ओळखमुद्रा दाखवित नव्हता.

**काळुजी**—मी ? विजापूरच्या दरबारांत ? नाईक ! काय बोलतां आहांत हें ?

**गजरा**—म्हणजे विजापुरीं का जाणं झालं होतं ?

**हिरोजी**—नुसता गेलो नव्हतों—चतुर्भुज होऊन गेलों होतों. राऊळींच्या देवासारखा नव्हे तर कडीकपारींतल्या चोरासारखा गिरफदार होऊन गेलों होतों.

**पुतळा**—म्हणजे म्हणतोस तरी काय दादा ?

**हिरोजी**—काय म्हणायचं ! ह्या बेरडाला तुझ्या नवऱ्याला विचार.

**काळुजी**—मला ! मी काय केलं बुवा ?

**हिरोजी**—हरामखोरी करून वर खोटं बोलायला शरम नाही वाटत ?

**काळुजी**—देवाची शपथ ! मी कधी दरबारांत पायसुद्धां टाकला नाही.

**पुतळा**—विजापूर दरबारींच जाणं झालं होतं ना ?

**काळुजी**—विजापूर दरबारी म्हणजे कांही दरबारांत नव्हे. वजीर वाकनिसांशी आमचा संबंध. खलिते दिले, खलबतं केलीं आणि निघुन आलों.

**हिरोजी**—पण मी शिवाजीचा मराठा म्हणून कुठल्या बदमाषानं सांगितलं दरबारांत ?

**काळुजी**—ते मी काय सांगूं ?

**हिरोजी**—मराठी खलित्यांतला मजकूर कुठल्या मराठ्याच्या कुसंतानानं वाचून दाखविला ?

**काळुजी**—तें मला काय विचारतां ?

**हिरोजी**—माझंच माथं तर फिरलं नाही ? काय डोळे बेभान झाले की मदनं मसणवाट पकडली ? मुसलमानांनी सांडसांच्या शिळेवर चढवलं आणि अचानक खालीं उतरलं तेंही स्वप्नांत का ? हातचा खलिता गेला आणि अब्रूचा पलिता झाला, तोहि स्वप्नांतच का ? आतां बोलतों आहे हेंहि स्वप्न की विजापुरीं अनुभवलं तें स्वप्न ?

**गजरा**—असं झालं तरी काय विजापुरीं ?

**हिरोजी**—काय झालं तें कसं सांगूं ? गजरा, तुझा नवरा हा तुला समोर दिसतो आहे, तो घरी आलेला पाहून तुला आनंद वाटतो आहे.



हिरोजी—उपस तुझी तलवार आणि उडीव माझी गर्दन !

पण हा तुझा नवरा नव्हे—बाजीप्रभूच्या पायाला हात लावून स्वराज्याच्या सेवेसाठी निघालेला हिरोजी नाईक विजापुरीं मेला. हातचा लखोटा घालवून अब्रूचा मुडदा पडला त्याचवेळीं तुझ्या नवऱ्याचाहि मुडदा पडला. मी जिवंत आलों हें पाहून तुला आनंद वाटला पण मी जिवंत आलों म्हणूनच मला मेल्याहून मेलं झालं आहे. आतां कुठल्या तोंडानं बाजीप्रभूकडे जाऊं ? कोणत्या डोळ्यानं त्याच्याकडे पाहूं ? कोणत्या वाचेनं जाब देऊं—आणि जाब तरी काय देऊं ? या या बेरडानं—

**काळुजी**—हं खबरदार. आतांपर्यंत ऐकून घेतलं तें मेहुणा म्हणून. पण आतां एक जादा बात येईल तर समशेरीच्या फटक्यानं एकाचे दोन हिरोजी करीन.

**हिरोजी**—तसं केलंस तर माझ्यावर उपकार होतील. जीव देणं पाप नसतं तर आज मी गळ्याला गळफांस लावून जीव दिला असता, एवढी भयंकर आगळीक आज माझ्यावर आली आहे. विजापूरच्या पायरीवर मुसलमानांच्या हातून माझा मुडदा पडला असता. पण मन मला ग्वाही देतं कीं तूं—तूं मला सोडून द्यायला लावलंस. आतां कां दचकतोस ? तुझ्या पापानं तुझ्या काळजाला चिमटा घेतला ? उपस तुझी समशेर आणि उडीव माझी गर्दन ! तशी माझी गर्दन उडवली आहेस, आतां अशी उडीव आणि मला या पापांतून मोकळा कर.

**गजरा**—जिवाला असा त्रास करून घेऊं नये. घरीं चलायचं आतां. काय झालं तें ऐकण्यासाठीं माझा दुबळा जीव कसा तळमळतो आहे.

**हिरोजी**—आतां कसलं घर आणि कसलं जिणं ? स्वराज्याच्या सेवेंत ज्याचं पाऊल आडवं पडलं, त्याला घरची पायंडी तरी कशी पाऊल वाट देईल ?

**गजरा**—माझं ऐकायचं आतां. काय बोलायचं तें माझ्यापाशी—काय रागवायचं ते माझ्यावर—काय शिक्षा करायची असेल ती या सत्तेच्या सेवेकरणीला. [ त्याला ओढून नेते ]

**हिरोजी**—[ जातां जातां ] ठीक आहे काळुजी ! एकदां घडली वार्ता बाजीप्रभूंच्या कानावर घालतों, आणि नंतर तुझा समाचार घेतों ! मांग ! रामोशी ! !

**काळुंजी**—हा तुझा भाऊ ! याच्या घरीं तूं मला आंबाड्याची भाजी चारणार होतीस ?

**पुतळा**—मला काय माहीत, की हा इतका उलट्या काळजाचा असेल म्हणून ? बरं. मला आतां असं सांगायचं, हा असा उलटायला कांहीं कारण झालं, कीं आपला नुसताच अफसोस करतो आहे ?

**काळुजी**—निष्कारण कोण कशाला कुणावर उलटेल ? त्याला तसंच कारण झालं आहे.

**पुतळा**—काय कारण झालं आहे—मला नाहीं का सांगायचं ? म्हटलं माझी कांहीं अक्कल चालली तर पाहीन.

**काळुजी**—विजापूरच्या दरबारांत जाऊन त्यानं शिवाजीविरुद्ध दगलबाजी केली आहे. त्या दगलबाजीचा पुरावा मला मिळाल्याचा त्याला संशय आला असावा.

**पुतळा**—नुसत्या संशयानंच का त्यानं एवढा हैदोस उडवला ? काय तरी बाई स्वभाव !

**काळुजी**—स्वभाव कसला ?—माणूस गुन्हेगार असला, कीं आपला गुन्हा दुसऱ्या कुणावर तरी लोटायचा सदोदित प्रयत्न करीत असतो. मी सावंतवाडीचा वाडकर आहे. वाडीचे सरदेसाई मध्यं शिवाजीचे दोस्त झाले होते. आतां त्यांची लहर फिरली आहे. फिरून एकवार त्यांनीं विजापूरकरांची कांस पकडली आहे. शिवाजीच्या कानावर ही बातमी जायची राहिली नसल. एकदां बातमी कळली, की शिवाजी सरदेसायांचा पिच्छा पुरवल्याशिवाय राहणार नाहीं. तेवढ्यासाठीं मला या करवीरांतच राहिलं पाहिजे. इथले भेद काढून धन्यांना वेळच्या वेळीं पोंचवले पाहिजेत. सरदेसायांनीं कुणाचीही दोस्ती करण्याची भूल दाखवली तरी वास्तविक त्यांचा कारभार अगदीं स्वतंत्र आहे. विजापूरकर मरोत किंवा शिवाजीचा पाडाव होवो, वाडकरांना त्याची तमा नाहीं. तुला तर शिवाजीचा मोठा अभिमान आहे. माहेरचा कावळासुद्धां बायकांना प्यारा वाटतो. मग हा तर तुझ्या माहेरचा राजा. बोल आतां, तूं कोणत्या बाजूला येणार ? शिवाजीच्या की वाडकरांच्या ?

**पुतळा**—आम्हां बायकांना कसली आली आहे कुणाची बाजू? आमचं ज्ञान आपलं चुलीपुरतं.

**काळूजी**—मग आतां अक्कल चालवणार होतीस ती कशी?

**पुतळा**—आपली मी नुसती थट्टा केली हो!

**काळूजी**—थट्टा नको-मला तुझी मदत पाहिजे.

**पुतळा**—बोलून चालून मी बायको माणूस-या राजकारणांत मी कसली मदत करणार?

**काळूजी**—या राजकारणांत हत्तीपासून मुंगीपर्यंत सर्वांचीच मदत पाहिजे असते.

**पुतळा**—आतां मुंगीनं हत्तीला काय मदत करायला हवी, तें एकदां सांगून टाकावं.

**काळूजी**—आतां याच पावला मी गडावर जाणार आहे.

**पुतळा**—म्हणजे घरीं यायचंच कां नाही आतां?

**काळूजी**—कामाचं महत्वच तसं आहे. शिवाजींची भेट होणं मुष्कील आहे, तेव्हां मोहिमेचा मुख्य सेनापती बाजीप्रभू देशपांडे यांची मी गांठ घेणार आहें. हा हिरोजी, नाईक म्हणून बाजीचाच अंमलदार आहे. त्यानंच त्याला विजापुरला पाठवलं असावं, अशीहि मला जबर शंका आहे. तसं असो किंवा नसो तो त्याच्या हाताखालचा अंमलदार आहे एवढं मला पुरे आहे.

**पुतळा**—तो बाजीप्रभूच्याच हाताखालीं आहे हं मला पक्कं ठाऊक आहे.

**काळूजी**—झालं तर. आतां तूं एक काम कर. हिरोजीच्या घरीं जा. त्याचा ताळमेळ पहा. तो कुठं जातो आहे याचा कानोसा घे आणि जर कां तो बाजीप्रभूला भेटायला निघत असेल तर त्याला घटकाभर अडवून ठेव.

**पुतळा**—पण तें कसं साधेल?

**काळूजी**—हीच का तुमची मुत्सद्देगिरी!

**पुतळा**—एवढं हिणवायला नको कांहीं. मला देखील थोडं राजकारण कळतं. आतां हिरोजीच्या घरीं जातें आणि इकडच्या स्वभावाला चार नांवं ठेवतें. भांडून आलें आहें असें सांगतें. हिरोजीला दादा बाबा करून त्याची हकिगत विचारीत रहातें आणि कसा तरी घटका दीड घटका वेळ काढितें. पण तोंपर्यंत तिकडे काय काम असेल तें उरकून घ्यायचं आणि यापुढं-ठरलं बरं का, मला विचारल्याशिवाय कांहीं करायचं नाही. दर कामगिरींत मला भाग मिळायला हवा.

**काळूजी**—तेवढ्यानेंच कांहीं भागत नाहीं. हिरोजीच्या हालचालींवर सक्त नजर ठेव आणि जें जें कांहीं होईल तें ते मला येईन तेव्हां कळवीत जा.

**पुतळा**—त्याची नको काळजी. शिवाजीच्या हेरांनासुद्धां लाजवलं नाहीं तर नांवाची पुतळाच नव्हे.

**काळूजी**—तरी म्हटलं माझी कारभारीण आहे ! येऊं तर आतां मी ?

**पुतळा**—शिपाईगिरीच्या त्या गजराला मोठा दिमाख आहे. आतां पहातें या मुत्सद्देगिरीशीं कशी टक्कर देते ती ! [ दोघं दोन बाजूंने जातात. ]

---

## प्रवेश ३ रा

**स्थळ**—पन्हाळगडावरील एक वाडा

[ जिजाबाई, बाजी व अनाजी दत्तो ]

**बाजी**—मासाहेबांच्या मर्जीला येईल तसं व्हावं; आमचा आग्रह नाही.

**जिजाई**—आग्रहाचा काय संबंध ? शिवबापाशी आम्हीं आग्रह कधीच धरला नाहीं. नवा किल्ला हातीं आला, खेळण्याचा विशाळगड झाला; आम्हांला वाटलं, तिथं रहावं. शिवबांची इच्छा मात्र आजच येण्याची नाहीं. हरकत नाहीं.

**बाजी**—आतां विजापुरच्या खबरेकडे डोळे लावून इथंच राहिलं पाहिजे. अफझुलखानासारख्या बड्या भटाऱ्याला महाराजांनीं समशेरीचं तिरपं जानवं वाहिल्यापासून विजापूरकरांना दहशत बसली असेल, असं सर्वांना वाटत होतं. पण महाराजांचं धोरण कांहीं न्यारंच. कर्नूलचा शिद्दी जौहार विजापुरला गेल्याची बातमी अवचित महाराजांच्या हातीं

आली आणि विजापूरची थंडी हवा एकदम गरम होणार, असं भविष्य महाराजांनीं वर्तवलं. नाकी रोखून आज आह्मी स्वस्थ बसलों आहोंत. लढाईची आग केव्हां कुठून भडकेल याचा कांहीं नेम नाहीं.

**जिजाबाई**—खरं आहे. शिवबाला वाटलं होतं कीं, पन्हाळा मजबूत आहे; पण आतां खात्री गेली. पन्हाळ्याची कुंडली मांडली तर पापग्रहांचं प्राबल्य फार दिसतं. लढाईची आग कुठूनही आली तरी तिची झळ पन्हाळ्याला नको आहे.

**बाजी**—पन्हाळा किल्ल्याच्या काबिजीसाठीं महाराज निघाले, तेव्हां रुस्तुमजमानानं विजापुरच्या वशिल्यानं त्या छोटया मोहिमेला जंगी लढाईचं रूप दिलं. या डोंगराळ मुलखांत मोंगलांचं पाऊल कच खातं, ह्मणून मराठयांचे बच्चे विजापुरकरांच्या वेशी राखीत होते. त्यामुळंच ह्या अनाजी दत्तोंना पन्हाळ्याच्या पायथ्याशींच फितुरी करतां आली. पवनगड आणि वसंतगड लवकरच स्वराज्यांत सामील झाले आणि रांगणा खेळण्याच्या पाळण्यांत स्वराज्याची दौलत झोंके घेऊं लागली. पण आतां विजापूर-करांच्या घडामोडीकडे पाहिलं तर या पन्हाळ्याविषयीं पुन्हां धास्ती वाटूं लागते.

**जिजा**—ह्मणूनच ह्मणतं कीं, तुह्मी—सरदारबारगिरांनीं—प्याद्याफर्जीनीं खबरदारीनं राहिलं पाहिजे. वैऱ्याच्या नजरेला खेळण्या पन्हाळ्याचा रस्ता दिसूं नये एवढा शिबंदीचा कोट उभारला पाहिजे. मराठेशाहीची अब्रू कसाला लावतांना बिनीच्या प्याद्याला देखील धोका येतां कामा नये, तिथं पन्हाळ्याचं महत्त्व विसरून चालायचं नाहीं. शिवबा सर्व जाणतच आहेत; पण वेळीं जाग देणं तुमच्या हातीं आहे.

**बाजी**—आज काळजी आहे ती शिद्दी जौहरची. शिद्दी जर विजापुर-करांना मिळाला, तर धुमधडाक्यानं लढाईला तोंड द्यावं लागेल. अफझुलखानामागं त्याच्या तोलाचा हाच एक समशेरजंग आहे, अशी त्याची दिगंत कीर्ति आहे. आणि ह्याच पायीं विजापुराकडे डोळे लावून समशेरी-वर हात ठेवून आह्मांला सावध राहिलं पाहिजे. बिनीची शिबंदी सामोरी ठेवून रिकिबेला जोडा आणि बंदुकीला तोडा जय्यत ठेवला पाहिजे.

**जिजा**—रास्त बोललांत ! स्वारीची वेळ जवळ आली आहे, आतां जास्त सांगणं कशाला ? तुम्ही शिवबाचे जिवाभावाचे सरदार, आमच्या परीस जिवाचे कलिजे. दौलतीला देह वाहिलात, तेव्हांच तुमची स्वामीनिष्ठा दिसून आली. शिवबा आमच्या कुसव्याचा गोळा म्हणून बोलत नाहीं, तर मराठेशाहीचा पंचप्राण तुमच्या हातीं दिला आहे. पुन्हां भेटीला विशाळगडीं आमच्या सुपुर्द व्हावा. जास्त काय बोलूं ? येतों आम्ही.

[ दासीसह जिजाबाई जाते. दुसरीकडून शिपाई येतो. ]

**शिपाई**—सावंतवाडकरांचे कुणी शिलेदार आल्याती. सरदारसाहेबांची खासगी भेट व्होवी म्हंगत्याती

**बाजी**—सावंतवाडकरांचे शिलेदार ? आणि आमच्या खासगी मुलाखतीला ? जा, त्यांना आंत घेऊन ये. [ तो जातो. ] सरदेसाई तह मोडून आमचेवर उठले आहेत. आमचे बाजी पासलकर त्यांची खबर घ्यायलाही गेले आहेत—आणि इकडे हे शिलेदार आमच्याकडे कां ?

**अनाजी**—कांही दगा फटका तर नाही ?

**बाजी**—तुह्मी दूर रहाः—खासगी भेट हवी आहे त्यांना !

**अनाजी**—कानाच्या टापूबाहेर जवळच असतो. जरूर पडल्यास साद द्यावी. [ जातो. ]

[ काळूजी प्रवेश करतो ]

**काळूजी**—दंडवत सरदारसाहेब !

**बाजी**—कोण ! काळूजी जाधव ! या—या बसा असे.

**काळूजी**—मला गरिबाला एवढा बहुमान कशाला ? सावंतवाडकरांच्या—आपल्या शत्रूच्या चाकरीतले आह्मी जाधव. सरदेसायांचे दूरचे सगेही लागतों. आपण सर्व जाणतच आहां. विजापूरी वकिलासोबत सरकारच्या आज्ञेनं गेलो होतो. परत फिरतांना मनीं आलं कीं, पन्हाळगडी आपली भेट घ्यावी.

**बाजी**—अस्सं ! तुमच्या मनी आलं कीं, तुमच्या वकिलांच्या ?

**काळूजी**—आमच्या वकिलांच्या मनीं कसं येईल ? ते सरदेसायांचे अभिमानी सेवक. सरदेसायांच्या मनसुब्याबरहुकूम विजापूरचं राजकारण

साधणारे. त्यांचं इमान सरदेसायांच्या सेवेला वाहिलेलं! विजापूर पाहिलं, विजापूर दरबारचं राजकारण पाहिलं आणि म्हणूनच मला आपल्या भेटीची जरूरी वाटली. छत्रपतींची भेट आह्मांला दुर्मिळ—आणि तशीच कांहीं सेवा घडल्याशिवाय छत्रपतींचं दर्शन तरी आह्मांला कां व्हावं? ह्मणून ह्मटलं, आधीं सरदार बाजीप्रभूंना मनसुबा विदित करावा. पुढं होणं जाणं श्रीपाटेश्वराच्या हातीं.

**बाजी**—कोणत्या मनसुब्यानं येणं केलं! दिल खुला करून जें कांहीं बोलायचं तें स्पष्ट बोलावं. अगदीं संकोच धरूं नये.

**काळूजी**—एवढी सवड मिळेल असं येतांना मला वाटलं नव्हतं. हो, अकल्पित येणं त्यांतून आह्मी अडीनडीचे. आतांच वाडकरांनी तह मोडला आणि पितांबर शेणव्याच्या कारवाईला खो आणला. पहिल्यापासून पितांबर शेणव्याशीं आमचा घरोबा. छत्रपतींची भेट घेऊन ते परत आल्यापासून दुसरी गोष्ट कशी ती कधीं कानीं आली नाहीं. येतांजातां छत्रपतींची स्तुती. उठतां बसतां त्याच गुणवर्णन. महाराजांचं पुराण कसं अष्टौप्रहर चाललेलं. त्याचा आमच्या मनावर परिणाम झाला. प्रत्यक्ष दर्शनाची हुरहुरी त्यामुळंच उत्पन्न झाली. पण दुर्दैवानं सावंतवाडकरांचा चाकर पडलों, सुलतानाच्या दरबारीं जाणं भाग आलं.

**बाजी**—वेळेला मोल आहे. आह्मी शिपाई गडी शिस्तीचे चहाते आहोंत. फुका पाल्हाळाची आह्मांला मनापासून शिसारी आहे. जें कांहीं सांगणं तें आटोपशीर असावं.

**काळूजी**—सांगणं ह्मणून एवढंच कीं, विजापूरची कारवाई पाहिली तेव्हां मनाला वीट आला. मनाची भूमी आधींच तयार झालेली, बीं पेरलेलं, पाऊस पडतांच अंकुर फुटला. वकिलांना साष्टांग नमस्कार केला आणि तडक करवीराची वाट धरली.

**बाजी**—नेमकी करवीराचीच कां वाट धरली? राजगडी कां गेलां नाहीं?

**काळूजी**—विजापूरांतच कळलं कीं, आपण आणि महाराज करवीरप्रांतीं पन्हाळ्यावर आहांत आणि तिथून लौकरच विशाळगडीं जाणार आहांत.

**बाजी**—हें विजापुरांत कळलं

**काळूजी**—होय सरदारसाहेब. शिवाय माझी सासुरवाडी इथंच आहे. विजापुरीं जातांना कुटुंबाला इथं माहेरीं पोंचवायला आलों होतों. त्या वेळीं छत्रपती इथं नव्हते म्हणून साशंक होतों. पण विजापुरीं खात्रीची बातमी मिळाली—

**बाजी**—खात्रीची बातमी विजापुरीं मिळाली ?

**काळूजी**—होय ! विजापुरींच मिळाली—अली आदिलशहाच्या दरबारीं मिळाली. छत्रपतींवर मोहीम करण्याचा घाट घाटत असतांना मिळाली.

**बाजी**—महाराज करवीर प्रांतीं आहेत असं कळल्यामुळंच का त्यांनीं हा मोहीमेचा घाट घातला ?

**काळूजी**—नाही—मोहिमेचा घाट आधींच घाटत होता, त्याच वेळीं महाराजांच्या मुक्कामाचा नेमका पत्ता दरबारला लागला.

**बाजी**—आश्चर्य आहे ! विजापुरकरांचे हेर कमकुवत आहेत असा आमचा समज होता !

**काळूजी**—नुसते कमकुवत कां ?—चांगलेच बेवकूफ आहेत. छत्रपतींच्या हेरांची सर विजापूरच्या हेरांना येणं मुष्किल आहे.

**बाजी**—मग महाराज इथं पन्हाळ्यावर असून विशाळगडी जाणार आहेत, हे विजापूर दरबारला कसं कळलं ?

**काळूजी**—हे आपल्याच माणसाचं काम आहे आणि हे आपल्या कानीं घालण्यासाठींच मीं इतक्या तांतडीनं आलों आहे, सरदारसाहेब.

**बाजी**—आमचीं माणसं ? कोण आमचीं माणसं ? स्वराज्याच्या दौलतींत असे कोण हे निमकहराम ?

**काळूजी**—सरदारांनीं ऐकून घ्यावं. अली आदिलशहाचा दरबार भरला होता. अफझुलखानाचे चिरंजीव फाजल महंमद बापाचा सूड घेण्यासाठीं बादशहाला चिथावीत होते. पूर्वीच्या अपजयानें कच खाल्लेला बादशहा खचून गेला होता. त्याला आतां शिदी जौहरची ढिगी मिळाली—

**बाजी**—तें आम्हांला माहीत आहे. पण तिथं ही बातमी कुणी सांगितली ?

**काळूजी**—इतक्यांत एक मराठा शिपाई दरबारी दाखल झाला—

**बाजी**—मराठा शिपाई ?

**काळूजी**—होय. मराठा शिपाई दरबारी आला आणि त्यानं एक लखोटा बादशहाच्या हातीं देऊन, मोठ्या अदबीनं त्रिवार कुर्निसात केला.

**बाजी**—त्याचं नांव कळलं का तुम्हांला ?

**काळूजी**—हिरोजी नाईक त्याचं नांव.

**बाजी**—हिरोजी नाईक ! हिरोजी नाईक ?

**काळूजी**—होय सरदारसाहेब.

**बाजी**—तरी मला वाटलंच होतं ! बरं पुढं ?

**काळूजी**—त्यानंच लखोटा दरबारीं सुपुर्द केला. खलिता मोडींत होता. फाजलसाहेबांनी तो आमच्या वकिलांच्या हातीं दिला. वकिलांनी वाचून दाखविला आणि तोंडी तर्जुमाही करून सांगितला.

**बाजी**—त्यांतला मजकूर तुह्मी ऐकला असाल ? कुणाला उद्देशून होता ?

**काळूजी**—विजापुरांतील आपल्या एका हेराला. त्या हेराचं नांव जरी त्या खलित्यांत नव्हतं तरी त्यावरून तीन गोष्टी तिथं कळून आल्या. एक, छत्रपतींचा हेर विजापूर दरबारीं आहे. दुसरी, शिद्दी जौहर विजापूरकरांना मिळणार हें छत्रपतींना कळलं आहे आणि तिसरी, छत्रपती सध्यां पन्हाळ्यावर असून लौकरच विशाळगडीं जाणार आहेत.

**बाजी**—त्यानं आपखुषीनं तो लखोटा दरबारीं दिला की जबरदस्तीनं त्याच्याकडून काढून घेतला.

**काळूजी**—जबरदस्तीनं घेतला असं कसं ह्मणूं सरदारसाहेब ?

**बाजी**—तुमची बात बनावट नाहीं कशावरून ? काळूजी ! तुह्मी आमच्या पूर्ण परिचयाचे असलांत तरी सरदेसायांकडचे म्हणून पुसतो. सरदेसायांचे वतीनं आमची दिशाभूल करण्याचा हा घाट नाहीं कशावरून ? हे वाडकरांचंच कारस्थान नाहीं कशावरून ?

**काळूजी**—ही शंका येईल ही मला खातर होतीच. एवढ्यासाठीं तो लखोटा मुळीं मी जातीनं चोरून घेऊन आलों. सेवा करण्याची बुद्धी देवानं दिली म्हणून ही आगळीक करावी लागली. आमच्या वाडीच्या वकि-

त्यांकडे उर्दू तर्जुमा करण्यासाठीं दरबारनं तो लखोटा दिला. इकडे येतांना पुरावा हातीं पाहिजे म्हणून मी तो गफलतीनं हातीं घेतला—चोरी केली. आगळीक घडली ती स्वराज्यासाठीं, ही मनांतली खूणगांठ धरून रातोरात विजापूरांतून काढतं पाऊल घेतलं. वाटेत मला हिरोजी भेटला पण त्याला झुकांडी द्यायला फारसा वेळ लागला नाहीं.

**बाजी**—म्हणजे, हिरोजी विजापुराहून परत फिरला?

**काळूजी**—हिरोजी परत फिरला म्हणूनच मी मजल दरमजल दौड करीत त्याच्या पूर्वी हा मुक्काम गांठला. ज्या गादीची नोकरी पत्करायची तिची आधीं कांहीं सेवा करून दाखवायची म्हणून हा गुन्हा करावा लागला सरदारसाहेब.

**बाजी**—कुठं आहे तो लखोटा?

**काळूजी**—हा घ्यावा ( लखोटा हातीं देतो. बाजी तो वाचूं पाहूं लागतो ).

**बाजी**—ठीक आहे. तुम्हीं आतां जा. हिरोजी येतांच मी या गोष्टीची शहानिशा करून घेईन.

**काळूजी**—आतां माझी काय वाट? वाडकरांचा अपराधी ठरलों, पण इथंही हरलों तर दाही दिशा मोकळ्या होतील नाहीं ही थड, नाहीं ती अशी माझी स्थिती होऊन जाईल. स्वराज्याची सेवा मनांत आणली, एवढ्याचसाठीं मी अन्नाला मोताद होईन. अंगाची रग आणि मनगटाची खुमखुमी छत्रपतींच्या सेवेला वहायची आधाशी आशा निष्फळ झाली, तर प्राणत्यागाखेरीज दुसरा इलाज राहाणार नाहीं. सरदारसाहेब, आपणही एके काळीं विजापुरकरांचे बंदे होतां—आपणही अशीच स्वराज्याची सेवा पत्करली होती, याची आठवण करा आणि आपल्या पावलावर पाऊल टाकून येणाऱ्या या हाडाच्या मराठ्याचा अकारण संशय घेउं नका.

**बाजी**—ठीक आहे. जा आतां. उद्यां मला भेटा. हिरोजीच्या प्रकरणाचा मुकाबला झाल्याखेरीज तुम्हांला उत्तर देतां येत नाहीं. अखेर हिरोजी फितूर झालाच अं! जा—जा—हिरोजीच्या तोंडून आधीं त्याची कैफियत ऐकेन, मग तुमचा मामला पाहतां येईल— उद्यां भेटा

[ काळुजी जाऊं लागतो ] पण थांबा—अजून कदाचित् जरूर लागेल. कोण आहे रे तिकडे ? [ शिपाई येतो ] यांना घेऊन जा आणि आमच्या वाड्यांत चौकी पहाऱ्याच्या नजरेखालीं ठेवायला नाइकांना सांग. त्यांना ह्मणावं हे कैदी नाहींत. नुसते बंदोबस्तांत ठेवायचे यांना. समजलास ? [ शिपाई काळूजीला घेऊन जातो. ] हिरोजी फितूर ! हिरोजी विजापूरकरांना सामील झाला ! खडा मारल्याप्रमाणं जिवाच्या जोखमीची कामगिरी पार पाडणारा हिरोजी खरोखरच का धन्याशीं बेइमान झाला ? सिध्या तब्येतीचा हिरोजी खाल्ल्याघरचे वांसे मोजणार नाहीं, असं एका परीनं वाटतं खरं; पण परवांच्या लढाईत, फाजल महंमदाला कऱ्हाडच्या वाटेनं विजापूरला सुखरूप जाऊं देणाऱ्या त्याच्या मामाला महाराजांनीं कडेलोटाची जबर शिक्षा दिली आहे. तेव्हां हा माथेफिरू आपल्या मामाच्या कडेलोटाचा अशा विश्वासघातानं सूड घेत नसेल कशावरून, अशी शंकाहि दुसऱ्यापरी आल्याविना रहात नाहीं. किंवा हा काळूजी जाधवच विजापूरकरांचा हेर ह्मणून येऊन माझ्या कानांत हिरोजीविषयीं हें विष ओतीत नसेल ना ? पण छे: ! तसंही वाटत नाहीं. कारण हिरोजी त्याचा मेहुणा आहे. तो शत्रूचा हेर असता तर महाराजांच्या हालचालीची खबर विजापूर दरबारला समजली आहे, हे आह्मांला येऊन सांगण्याचं प्रयोजन नव्हतं. उलट ही खबर आह्मांला मिळाल्यास महाराज आपल्या हालचालीच्या आंखणीत बदल करून भलत्याच किल्ल्याशीं नवे मोर्चे बांधतील आणि बादशहाच्या हातावर तुरी देतील, हें न जाणण्याइतका बेवकूफ तो खात्रीनं नाहीं. मग काय हिरोजीलाच निमकहराम समजावं ? पण बेकायदा उतावीळ लागी नाहीं ! हिरोजीच्या जबानीनंतरच निर्णय केला पाहिजे.

**शिपाई**—[ प्रवेश करून ] हिरोजी नाईक बाहेर आल्याती.

**बाजी**—त्याला एकदम आंत पाठीव. [ शिपाई जातो ] काळोजीची खबर आतां मनच्या मनांत—[ हिरोजी येतो-मुजरा करून स्वस्थ रहातो ] हिरोजी, काय खबर आहे विजापूरची ? [ हिरोजी बोलत नाही असं पाहून ] कां, बोलत कां नाहींस ?

**हिरोजी**—काय बोलूं ? लंकेला जात्या मारुतीगत कामगिरीवर गेलों; पण अयोध्येला येत्या भरतागत मेल्या दिलानं परत आलों. हें काळं तोंड घेऊन परत

येण्याची शरमच वाटत होती: पण दौलतीचं काम मी आल्यानंच थोडं साधेलसं वाटलं ह्मणून हजर झालो.

**बाजी**—ह्मणजे असं झालं तरी काय ?

**हिरोजी**—माझ्या कमनशिबाचा कडेलोट झाला. करामतीला काळोखी फांसली–हातची थैली वैऱ्याच्या हातीं गेली.

**बाजी**—लाज नाहीं वाटत थैली वैऱ्याच्या हातीं गेली ह्मणून सांगायला ? कशी गेली ?

**हिरोजी**—विजापूरच्या आपल्या हेराची गांठ लवकर पडली नाहीं ह्मणून टेहळणीच्या झोंकानं दरबारशीं घोटाळलो. पहारेकऱ्यांनीं झडप घातली. पातेल-वणीच्या आंत गिरफदार झालो. पन्नास हातांच्या पकडीसमोर दोन हातांची चपळाई लुली पडली. दुष्मनांनीं थैली काढून घेतली आणि मला दरबारीं उभा केला.

**बाजी**—असं जर खरं, तर तुझी तिथून सुटणूक कशी झाली ? विजापूरच्या फत्तरांना तुला सोडून देण्याइतका पाझर फुटण्याचं कारण ?

**हिरोजी**—तेंच मला कळत नाहीं सरदारसाहेब !

**बाजी**—थैली तुझ्यादेखत फोडली !

**हिरोजी**—होय, माझ्यादेखत फोडली आणि माझ्या देखतच वाचली.

**बाजी**—थैलींतला मजकुर ऐकलास ? तो मजकूर कळल्यानं मराठ्यांच्या दौलतीवर केवढं संकट गुदरेल याची तुला कल्पना नाहीं आली ?

**हिरोजी**—आली आणि ह्मणूनच ही बातमी घेऊन जलदीनं पायांपाशीं आलो.

**बाजी**—त्या लखोटयावर कुणाचं नांव नव्हतं. हेराला तो तूं जातीनं द्यायचा होता. तो कुणाला देणार ह्मणून तुला बादशहानं विचारलं नाहीं ?

**हिरोजी**—विचारलं, पण मी सांगितलं नाहीं. माझं नांवही सांगितलं नाहीं.

**बाजी**—तोंडाचं कवाड खुलावं ह्मणून सांडसाची किल्ली लावली नाहीं त्यानं !

**हिरोजी**—तसा हुकूम सुटला होता. सजेच्या सजावटीनं मला उभाही केला होता; पण काय झालं न कळे, बादशहाचा हुकूम आला आणि मला सोडून दिलं.

**बाजी**—हिरोजी ! तुझ्या वर्तनाची शंका येण्यासारखी अशी वायफळ बडबड करूं नको. कुणाची मध्यस्थी तुला फळाला आली ते खरं सांग.

**हिरोजी**—खरं सांग ! खरं सांग ? माझ्याबद्दल असा संशय !

**बाजी**—कां येऊं नये तुझा संशय ! शत्रूचा हेर हातीं आला आणि त्याला सुखानं जाऊं दिला, असं कधी कुठं झालं आहे ? बातमी हातीं दिली त्या हेराला वैऱ्यानं कधीं परत जाऊं दिलं आहे ? विजापूरकरांचा हेर आम्हांस गवसला तर आम्ही काय त्याला इतमामानं विजापुरी पोंचता करूं ?

**हिरोजी**—आपलं म्हणणं खरं आहे, पण झालं हें असं आहे आणि तें कसं झालं हे एक त्या भगवंताला ठाऊक.

**बाजी**—यापेक्षां बेमालूम बात तुला बनवतां आली नाही ! मी पाळण्यांतलं पोर आहे असं का वाटतं तुला ? तुझी रीती सुरत पाहून काळजाचं पाणी करण्या-इतका मी गाफील नाही. तुझं म्हणणं खरं कशावरून ?

**हिरोजी**—मी सांगतों यावरून. यावेगळा दुष्मनाच्या दरबारीं मला आणखी पुरावा कुठला मिळायला ? माझा मराठ्याचा शब्द हीच माझी साक्ष.

**बाजी**—सर्वच मराठ्यांना शब्दाची किमत असती, तर महाराष्ट्रांत आज एक मराठेशाहीच नांदली असती. पण मराठ्यांतही जिभेनं साखरबोल बोलून अंतर्यामी फंदफितुरीचं विष घोळवणारे कांहीं मांग असतातच. ऐराव-ताचा डौल आणला म्हणून रेड्याचा कळकटपणा कधीं छपत नाहीं. खऱ्या मराठ्याचं नांव कशाला घेतोस ? असशील—मराठाही असशील ! पण ह्या वेळीं तूं छत्रपतींचा मराठा वाटत नाहीस तर विजापूरच्या मराठ्यांत शोभेसा मराठा तूं वाटतो आहेस.

**हिरोजी**—सरदारसाहेब ! नाहक नसत्या संशयानं मघांपासून चाकराला छेडतां आहां. आपण जाणतां कीं, हा हिरोजी भडक माथ्याचा आहे. माथ्यांतला सोशिकपणा संपला कीं, आपल्या सरदारकीची ओळख याला राहणार नाहीं. सरदारसाहेब, घडीभर मीही असंच म्हणतों कीं, माझ्या वागणुकींत संशयाला जागा आहे. तरपिण हा नुसता संशयच आहे ना ? मग आधीं मी संशयाप्रमाणें खरोखरच फितूर आहें हें शाबीत करा. नंतर तेढी बात बोला !

**बाजी**—खबरदार ! बेमुर्वत मनुष्या, पत्करलेल्या कामगिरींत ढिल्या वागणुकीनं संशयाला जागा ठेवून वर निर्लज्जपणानं बेगुन्हेगारीचा टेंभा मिरवायला लाज नाहीं वाटत ? मराठ्यांच्या फौजेत आपल्या सरदाराशीं कोणत्या अदबीनं वागावं लागतं हे दखल असूनही आज बेफाम बनलास ही गोष्टही तुझ्यावरचा संशय दुणावायाला कारण होत आहे. बोल ! कुठला परमेश्वर तुझ्या सुटकेसाठीं विजापूर दरबारीं धांवून आला ? कुठल्या पुण्याईपायीं वैकुंठाचं सिंहासन हादरून माफीचं फर्मान बादशाहानं सोडलं ? अशी कुठल्या पीराची फकिरी केलीस म्हणून अल्लाहोतालानं बादशाहाच्या कलेजांत तुझ्यासाठीं ठाणं दिलं ?

**हिरोजी**—बादशहानं मला जिवंत कशासाठीं आणि कां सोडलं हेंच मला समजत नाहीं. मी गुन्हेगार नाहीं एवढं मला समजतं आणि बेगुन्हा मराठ्याला शब्दाचा मार देखील चाबकाच्या फटकाऱ्याहूनही अधिक जाणवतो. म्हणून म्हणतो कीं, माझ्यावरचा फितुरीचा आरोप आधीं पुराव्यानं सिद्ध करा आणि नंतर मला वाटल्यास कडेलोटाचीही शिक्षा करा.

**बाजी**—बेमुर्वतखोर शिपायाच्या संशयी आरोपाचा छडा लावित बसण्यापेक्षां छत्रपतींच्या सरदारांना अधिक जोखमीची कामगिरी बजवायची आहे. ज्यानं आपल्या चाकरींत फितुरीच्या संशयाला जागा ठेवली त्यानंच आपली बेगुन्हेगारी शाबित करून दिली पाहिजे. अबघडी तुझी चाकरी दरबार नाकारीत आहे. तुझा नाइकीचा हुद्दा काढून घेण्यांत येत आहे.

**हिरोजी**—मग काय मी निमकहलाल असून निमकहरामागत काळ्याठिक्कर तोंडानं भाईबंदांत जाऊं ? ओठावर मिसरुड फुटल्यापासून छत्रपतींच्या मावळ्यांत धाडशी हेर म्हणून छाती काढून दिमाखानं वावरलो तोच मी आतां जातभाईंना धिक्कारानं तोंडावर थुंकायला वाव करून देऊं ? कां तर, काळ्याचे पांढरे होईतों मुसलमानाच्या चाकरींची हाडें चघळणाऱ्या आणि धनी मेल्यावर काल मराठेशाहींत येऊन फुसक्या सरदारकीचा दिमाख मिरविणाऱ्या ह्या—ह्या—ह्या—बाजी देशपांड्यासाठीं !

**बाजी**—खामोष ! मर्थीफरू सैताना ! तुला स्वतांची बेगुन्हेगारी शाबित करून घ्यायची संधी दिली असतां त्रागयानं माथ्यांत राख घालून मरण मात्र ओढवून घेतलंस. कोण आहे रे तिकडे ? [ कांहीं मावळे जल-



**गजरा**—नाहीं महाराज, हे फितूर नाहींत.

फोटोग्राफर्स—पाठक ब्रदर्स—नागपूर. [ पृष्ठ २९

दीनं पुढे येतात. ] एकदम ह्या निलज्जाच्या मुसक्या बांधा आणि तटाखालच्या पाताळदरींत उरावर दगड बांधून एकदम त्याचा कडेलोट करा. मराठ्यांच्या फौजेत वरिष्ठ सरदाराची इज्जत घेणाराला कोणती कठोर शिक्षा भोगावी लागते हे मृत्यूनंच त्याच्या अनुभवाला येऊं द्या. [ पडद्यांतून गजरा ओरडते—दया करा ! सरदार दया करा. छत्रपतींच्या पायाची ग्वाही देऊन पदर पसरते—या अभागी पोरीला पतीप्राणाचं चुडेदान द्या. ] अशी अवचित करुणेची किंकाळी फोडणारी कोण आहेस तूं ? अशी पुढे ये—सोडा रे तिला आंत.

**गजरा**—[ प्रवेश करून ] निष्पाप माथ्यावर अवचित आकाशींच्या कुऱ्हाडीचा घाला पडल्यानं बेभान झालेल्या ह्या आपल्या पाईकाची मी पत्नी—सरदार ! दया करा आणि ह्या पोरीला चुडेदान द्या.

**बाजी**—पण तुझ्या पतीवर कोणत्या गुन्ह्याचा आरोप आहे हें ठाऊक आहे तुला ?

**गजरा**—विजापुरची कामगिरी फसली तेव्हां इकडे कांही तरी अरिष्ट येईल असे मला वाटत होतं, म्हणूनच करवीराहून पन्हाळ्यापर्यंत मी ही पायपीट केली. अभागिणीला चुडेदान दिल्याशिवाय हे पाय मी सोडणार नाही.

**बाजी**—मुली, तुझा नवरा तुला भारी वाटत असला तरी तो राजांच्या दरबारचा गुन्हेगार आहे. फितुरीचा वहीम आणि वरिष्ठांची बेअदबी असा तो दुहेरी अपराधी आहे.

**गजरा**—नाही महाराज, हे फितुर नाहीत. लढाईचा डंका ऐकून फौजेपाठीं धूम ठोकतांना मागून येणाऱ्या जन्माच्या सोबतिणीकडेही ज्यांनीं कधीं मागं वळून पाहिलं नाही, ते फितुरी कशी करतील ? शिवाजी महाराजांचे नामस्मरण केल्याशिवाय देव्हाऱ्यांतल्या देवालासुद्धां ज्यांनी कधीं नमस्कार केला नाहीं, ते दौलतीचे दुष्मन कसे होतील ? विजापुरकरांचं नांव ऐकतांच रागानं थरथरलेले दांत रगडतांना ओठांतून रक्ताची चिळकांडी उडविणारे माझे पती, फितुरीनं बादशहापुढं दातांच्या कण्या करून कुंभ्यागत जिभल्या कसे चाटतील ?

**बाजी**—वेडे पोरी ! दौलतीच्या सरदारांचा उपमर्द करणाऱ्या मगरूराला बिनसजा सोडून दिला तर मराठेशाहीच्या ग्यादाफर्जीत किती बेशिस्त माजेल याची तुला दखल आहे का ?

**गजरा**—निरपराधीपणाची जीवी जाणीव असल्यामुळे संतापाच्या भरांत माझ्या शिपायाच्या तोंडून सरकारांना तेढा जाब गेला असल्यास त्याबद्दल मी त्रिवार नाक घांसतें. वैऱ्याच्या समशेरीपुढं बेगुमान छाती देणारा शिपाई जातीचा संतापी असतो. सरदार, झुकल्या मनानं बेभान बनून लढाईच्या धामधुमींत देहाची सांड करणारा समशेरजंग रागाचा गुलाम असतो. सरदार ! नजर फिरवून जरा अंतरीं पहा–आपणच सांगाल, की सीधा शिपाई तेढा मुत्सद्दी नसतो. एका साध्या शिपायाचा कडेलोट करून मराठेशाहीच्या दौलतीचं शिखर कितीसं उंचावणार ? दया करा ! सरदार दया करा ! आणि एका गरीब अबलेच्या चुड्यावर आपल्या करड्या समशेरीचा असा फटका मारूं नका. दयेचं दान कधी कालीं खात्रीनं फळाला येईल. माझ्या कुंकवाच्या मोलानं मायभवानी मराठेशाहीचं सौभाग्य खात्रीनं उजळ राखील. तुह्मांला लेकीसुना असतील, त्यांच्यावर असा प्रसंग आला तर ––

**बाजी**—ऊठ ऊठ मुली, केल्या मग्रूरीची तुझ्या पतीला एकवार क्षमा केली आहे. ऊठ. मात्र उद्यां सूर्योदयाच्या आंत ह्यानं ह्या पन्हाळ्याच्या पंचक्रोशींत राहतां कामा नये. हिरोजी, तुला ठाऊक आहे का, तुझ्यावर फितुरीचा आरोप आहे. वहिमाप्रमाणे तूं खरोखरच फितूर नसलास तर तुझ्याहून अधिक आनंद ह्या बाजी प्रभूला होणार आहे. पण याद राख, जर का वहिमाबर-हुकूम निमकहराम ठरलास तर तुझ्या बायकोलाही दयेची भीक न घालतां सम-शेरीच्या तडाक्यासरशीं तुझी मुर्दाछाट करीन. यारे त्याला सोडून. [ बाजी जातो. शिपाईही हिरोजीला सोडून निघून जातात. ]

**हिरोजी**—गजरा, गजरा, हे तूं काय केलंस ? मी निरपराधी असतां कशाला या बाजीची एवढी दया भाकलीस ?

**गजरा**—धनी, आपण निर्दोष असून नाहक मरण्यापेक्षां दया भाकून जगणं बरं नव्हे का ?



हिरोजी—या बाजीचा सूड आणि सूडच घेईन !

फोटोग्राफर्स—पाठक ब्रदर्स—नागपूर. [ पृष्ठ ३१

**हिरोजी**—छे, छे, अशा अन्यायी दयेनं जगण्यापेक्षां मेलेलं-मेलेलंच अतीं नामी.

**गजरा**—पण अशा अपकीर्तीच्या मरणांत आपल्या नांवावरचा फितुरीचा कलंक मात्र कालत्रयीं गेला नसता. त्यापेक्षां भिकेवर जगून आपण आपल्या संधीची वाट बघूं, तर महाराष्ट्राची मायभवानी एकदां तरी अशी घडी आणीलच आणील कीं, नेकजातीचे इमानी मराठे ह्मणूनच आपण छत्रपतींच्या कृपेला पात्र होऊं.

**हिरोजी**—पण छत्रपतींच्या भोवती गोळा झालेली, ही ह्या बाजीसारखी भुतावळ, मराठेशाहीत आमच्या कर्तबगारीला वाव ठेवील असं वाटतं तरी कसं तुला? काल मुसलमान तर आज मराठा असे चार दिवसांत चौदा धनी करणाऱ्या ह्या चौचालानं माझ्या इमानाला कलंक लावावा काय? दौलतीच्या चाकरीत जवानीची रग जिरविण्यासाठी, आह्मी या बड्या धेंडांच्या तोंडाकडे पहात रहातों आणि कीर्तीला चटावलेले हे असले खवीस, आमच्या शिपाई-गड्यांच्या पडत्या कुडीच्या पायऱ्या करून सरदार पदावर चढून बसतात. जिथं इमानदारीची कदर नाहीं, तिथं आपण चाकरीची तरी कदर कशाला करायची? बस्स! आतां यापुढं एकच निर्धार—दुनियेच्या पाठीवर वाटेल तिथं जाईन, प्रसंगीं वाटेल त्या दुस्मानाची चाकरी पत्करीन; पण हकनाहक माझ्या तोंडाला फितुरीचं काजळ फांसणाऱ्या या बाज्याचा सूड आणि सूडच घेईन. [ जातो ]

**अंक १ ला समाप्त.**

# अंक २ रा

## प्रवेश १ ला

( स्थळ—शंकराच्या देवळाजवळील पटांगण. दोन मुसलमान सैनिक येतात. )

**कासम**—अबे हसनभाई ! समोर पाहिलंस का ? मराठ्यांचे चौकीपहारे दिसत आहेत. आपल्या फौजेपासून आपण फार दूर आलों. कांहीं दगा फटका झाला तर आपल्या मदतीला कुणी धांवूनसुद्धां येणार नाही. शिवाय हा रस्ताही सीधा नाहीं. आपल्या विजापुराकडील रस्ते फार सीधे. इथं सारीं तेढी वळणं पहाड, टेंकड्या, नद्या, आणि नाले, यांची कशी खिचडी उडाली आहे. आपल्याला तर कंटाळा आला बुवा या मुलखाचा.

**हासम**—कासमभाई ! तुझ्या डोक्यांत नदीनाल्याशिवाय दुसरं कांही येतच नाही का रे ? अबे, जरा नदीनाल्याच्या कबरस्तानांतून माशुक पऱ्यांच्या परस्ना-नाकडे नजर टाक. मी तर ठरवलंच आहे, की या मुलखांतली एखादी तरी दख्खनी औरत पैदा करणार.

**कासम**—छत्, अशी कशी औरत मिळणार ? आपल्या फौजा तर दर कुच दरमजल नुसत्या वाटा तुडवताहेत. हें बघ, अजून लढाई नाहीं, आणि लढाई नाहीं ह्मणजे फत्तेमंदी नाही-आणि फत्तेमंदी नाहीं ह्मणजे लूट नाही--आणि लूट नाही ह्मणजे औरत नाही.

**हासम**—अरे, मग एकदां लढाई तरी करा ह्मणावं लौकर, ह्मणजे आह्मांला बायका तरी मिळतील आणि लढाई लौकर करायची नसेल तर आह्मांला नुसतीच तरी लूट करूं दे ह्मणावं—ह्मणजे तरी आह्मांला बायका पळवतां येतील. तोबा, तोबा, एकभी औरत नाही ! कसली ही मुलुखगिरी !

**कासम**—अबे, राहूं दे तुझी औरत. हें बघ शिद्दी जौहरनें सांगितलेलं तें हिंदूच्या अल्लाचं देऊळ. इथंच आपल्याला काळूजी जाधवांकडून शिवाजीची खबर मिळणार आहे. पण खबर घेऊन कोण येतंय् नकळे.

**हासम**—अरे मेरे हिंदूके अल्ला ! आतां खबर येईल ती तरी औरतेबरोबर येऊं दे. नाहीं तर,—आहे ! सुभानअल्ला ! नाम निकलतेही अस्मानकी परी सामने आया.

**कासम**—चल चल, बाजूला हो. काळूजी जाधवाचा मनुष्य येईपर्यंत आपल्याला इथंच कुठं तरी दडून बसलं पाहिजे.

**हासम**—अहारे, ढिले जमादार! बायकांना भितोस ? इतका वेळ औरत नाहीं म्हणून मी तळमळत होतों; आतां औरत आली म्हणून तूं तळमळतोस ?

**कासम**—अरे बाबा! आपल्याला कुणी बघितलं तर औरत राहील बाजूला आणि मधल्यामध्यें मरावं लागेल आपल्याला. [ दोघे बाजूला होतात तोंच पुतळा घाबऱ्या घाबऱ्या येते, इकडे तिकडे पहाते आणि देवळांत जाते. ] अरे ए! पण ही औरत कुणाची टेहळणी करीत आहे ?

**हासम**—टेहळणी गेली जहान्नममध्यें ऐक, तिच्या पायींचे पायल ऐक. कसा रुमझुम रुमझुम नाद देताहेत. जशा कांहीं बहिश्तींच्या घंटाच. अल्लाहोताला खान-साहेबांना दुवा देवो. काय कामगिरी मिळाली! या अल्ला!

**कासम**—अबे पागल! आपण आलों आहोंत कोणत्या कामासाठीं ?—

**हासम**—ओहो! ही कुदरतीची जिनगानी, ही परस्तानची गुलनार, ही अस्मानाची बिजली, ही इष्काची बिनमोल दौलत पहा! कसल्या कामगिरीच्या गोष्टी बोलतो आहेस या वेळीं ? माषाल्ला! माझा कलेजा तर फाटून गेला.

**कासम**—अबे! अशी बेवकूफी करीत रहाशील तर खानसाहेब फटक्यांचं रोगण लावतील तुझ्या कलेजावर. या मराठ्यांच्या औरता म्हणजे बड्या जादुगार अवलादी असतात. आपल्या गोषांतल्या बिबीजान नव्हत या. ही खूप याद राख.

**हासम**—असली पाकसुरत बिबी गोषांत सांपडणं मुष्कील म्हणून तर माझा दिल बेचैन झाला आहे.

**कासम**—अबे हासमभाई, अरे यार! ही दिललगी पुरे कर. त्या औरतेनं जर आपल्याला पछानलं, तर आतांच आरडाओरड होईल आणि आपली गर्दन धोक्यांत येईल.

**पुतळा**—[ पुढं येऊन ] कोणरे तुह्मी ? काय करतां आहांत इथं ?

**कासम**—बाईसाहेब, जादा बातेचं काम नाहीं. आह्मी कोण आहोंत दिसत नाहीं तुह्मांला ?

**हासम**--अरे मेरे यार ! अशी तेढी बात करूं नकोस. ही परी घाबरून जाईल ना ?

**कासम**--आमच्यासारखे जवानमर्द असल्या औरतांना भीत नसतात. बाई-साहेब ! बऱ्या बोलानं आपला रस्ता सुधारा. गडबड कराल तर याद राखा; आमच्याशीं गांठ आहे.

**हासम**—अबे ए ! औरतीशीं काय असं बोलतात ? या कोयलच्या आवाजाला ही कावळ्याची साथ होते आहे. बिबीजान ! आपका बंदा खिदमतमें हाजीर है.

**पुतळा**—काय वाटतं रे तुह्मांला ? तुमच्या बुरख्यांतल्या नाजूक नार आह्मी आहोंत ह्मणून ? मराठ्याची पोर एकटी बाहेर निघाली तरी तिचा साथी असा [ जंबिया दाखवून ] तिच्या हाताशीं असतो.

**कासम**—खबरदार ! आह्मीं म्हणजे तुला काय परसांतली भाजी वाटलों ?

**हासम**—वारे मेरे बिजली, कशाला ती कटयार ? तुझ्या नजरेच्या कटयारीनं माझा दिल कातिल झाला आहे.

**पुतळा**—पुरे कर हा चहाटळपणा. मी मर्द मराठ्याची औरत आहें. जवानांना धूळ चारण्याइतकं पाणी या धारेंत आहे कीं नाहीं याची साक्ष तुमच्यासारख्या बोलघुमटांना कशी पटणार ?

**कासम**—काय, काय ह्मणालीस ?

**हासम**—इनशाल्ला ! हिला हा परवल कसा कळला ?

**पुतळा**—तुह्मीं फाजलभाईकडून आलांत ?

**हसन**--माषाल्ला ? क्या अच्छी कही !

**पुतळा**—काळूजी जाधवांना भेटायला आलांत ?

**कासम**—पण हें तुम्हीं कसं पछानलं ?

**पुतळा**—एवढ्यावरून नाहीं तुमच्या ध्यानांत आलं ? एवढी खडानूखडा बित्तंबातमी सांगतें आहें तरी अजून तुमच्या डोक्यांत प्रकाश पडत नाहीं ? मग हेर कशाला झालांत ?

**कासम**—या अल्ला ! म्हणजे या देवळाजवळ भेटायला तुम्हींच आलांत ? आम्हांला फितवा पोंचविणार त्या तुम्हींच ?



**पुतळा**—अगदी अक्षरबरहुकूम हा निरोप खानसाहेबांना कळवा.

**पुतळा**—यापूर्वींच कळायला पाहिजे होतं तुम्हांला. पण शिपाई पडलांत, मुत्सद्दी नव्हे. आतां ऐका ! नीट लक्ष द्या आणि सांगतं तो निरोप अगदीं अक्षर-बरहुकूम खानसाहेबांना कळवा.

**हसन**—वारे मराठेकी अवलाद ! अशा धाडशी बाया जर आमच्या जातींत असतील तर—

**पुतळा**—वटवट लावूं नका. ऐका. शिवाजीमहाराजांनीं पन्हाळा सोडून विशाळगडाकडे जाण्याचा बेत केला होता हे तुम्हांला माहीत आहे ना ?

**कासम**—जी हां ! त्या तुमच्या हेराकडूनच ही बातमी आम्हीं काढून घेतली.

**हासम**—जी हां !

**पुतळा**—त्या हेराला तुम्ही सोडून दिलंत ना ? तो इकडे आला, बाजी-प्रभूला भेटला, दरबारीं घडलेली सर्व हकिगत त्यानं बाजीप्रभूंच्या कानांवर घातली. बाजीनं रागाच्या भरांत त्याला बडतर्फ केलं आणि हद्दपारीची शिक्षा फर्मावली.

**हासम**—बस्स एवढंच ! आमच्या सुलतानांनीं अशा आदमीचा एकदम कडेलोट केला असता.

**पुतळा**—थांबा, ऐका. एवढ्यानंच झालं नाहीं. आपली हालचाल विजापुरीं कळली असं शिवाजीमहाराजांना कळतांच त्यांनी पूर्वीचा बेत बदलला आणि विशाळगडीं न जातां पन्हाळ्यावरच राहायचं मंजूर केलं आहे.

**हासम**—इनशाल्ला ! काय अक्कल आहे !

**पुतळा**—तुमच्या खानसाहेबांनीं विशाळगडाकडे मोर्चा वळवला आहे. तुमची स्वारी विशाळगडाकडे वळतांच मागल्या बाजूनं मराठे एकदम तुमच्यावर छापा घालून तुम्हांला नेस्तनाबूद करतील.

**हासम**—तोबा-तोबा ! बडी अफसोसकी बात है.

**पुतळा**—जाधवांनीं म्हणूनच खानसाहेबांना निरोप दिला आहे कीं, एक-दम मोर्चे फिरवून पन्हाळ्याला वेढा द्या. पन्हाळ्याचा किल्ला बेमजबूत आहे. वेढा देऊन बाहेरची रसद बंद पाडली तर मराठे टिकाव धरूं शकणार नाहींत. समजलं ? अगदी अक्षरबरहुकूम हा निरोप खानसाहेबांना कळवा.

**कासम**—तकसीर माफ असावी. आपला निरोप खानसाहेबांना अस्सल बरहुकूम सुनावतों.

**पुतळा**—जरा थांबा. तुम्हांला आणखी एक महत्वाची सूचना द्यायची आहे. बाजीप्रभूनं हद्दपार केलेला हिरोजी नाईक इतक्यांतच गांवाबाहेर यायला निघणार आहे त्याला वाटेंत गांठा. तो मोठा माथेफिरू माणूस आहे. बाजी-प्रभूचा सूड उगवण्याची त्यानं कसम खाल्ली आहे. त्याला आपलासा करून घ्या, नोकरीची लालूच दाखवा आणि खानसाहेबांना जाधवांचा असा निरोप सांगा कीं, हिरोजीला पन्हाळगडच्या वाटा चांगल्या माहीत आहेत—या छाप्यांत त्याचा तुम्हांला चांगला उपयोग होईल, म्हणूनच आपल्या फौजेंत त्याला चांगल्या हुद्यावर सामील करून घ्या.

**कासम**—बहोत अच्छा—हीही कामगिरी आम्ही फत्ते करूं.

**पुतळा**—मी आतां जातें. पण दृष्टीपार गेल्याशिवाय रस्त्याला लागूं नका. कुणी पाहिलं तर संशय येईल. ( स्वगत ) बरं झालं, दादा आतां बिनघोक झाला. ( जाते )

**हासम**—गया—गया—मेरे आँखोका सितारा गया—मेरी गुलशन—मेरी गुलेनार निकल गया—माषाल्ला ! काय ही मराठ्याची अवलाद ! एवढीशी औरत—पण किती बेडर ! आम्हांला सुद्धां तंबी दिली अं ! बेडर ती बेडर पण किती खुपसुरत! तो कोयलचा आवाज, ती तिरछी नजर—जशी कांहीं इष्काची बर्चीच ! पहा, पहा कशी चालते आहे. पहा, वारे मेरे नाजनी—वारे मेरे बुलबुल ! दोस्त टाळी ! आधा काम तो होगया.

**कासम**—वह कोनसा ?

**हासम**—मैं उस्केउपर फिदा हूँ—अभी आधा काम होनेका बाकी है !

**कासम**—वह क्या ?

**हासम**—वह मेरेपर फिदा होनेकी बाकी है.

**कासम**—बरं ! चल चल ! पाय उचल, नाहींतर तुझ्याबरोबर माझंही गर्दन गमावेल. [ ऐकून ] कसला आवाज झाला. थांब, असा बाजूला हो. [ दोघे बाजूला होतात—लपलेला अरबवेषी खेळोजी पुढें येऊन इकडे तिकडे पाहतो व देवापुढें जाऊन नमस्कार करतो. ] फत्तराच्या समोर कुर्निसात करणारा हा रे कोण अरब ? हासमभाई ! यांत कांहीं तरी दगा आहे.

**हासम**—यान आपला बात आइून एकला नाहा ना ?

**कासम**—थांब, त्याला पकडूनच त्याची शहानिशा केली पाहिजे.

**खेळोजी**—शंभो हरहर महादेव !

**कासम**—अरे हा हिंदू–काफीर–सैतान. पहातोस काय पकड.

[ ते खेळोजीवर चाल करून जातात–त्यांची झटापट होते. खेळोजी निसटून पळूं लागतो. ते पकडो पकडो असं ओरडत त्याचेमागें धांवतात. ]

---

## प्रवेश २ रा

[ गजरा व हिरोजी प्रवेश करतात. ]

**हिरोजी**—नाहीं, गजरा नाहीं. आतां कालत्रयीं माझा बेत फिरणार नाहीं. मनगटांत मर्दुमकी असतांना त्या बाज्याचा सूड न घेतां मेल्या मढ्यागत शेतावर पडून राहणार नाहीं.

**गजरा**—बाजीप्रभूची तरी कसली चूक ? त्यांनीं केलं तें दौलतीच्या कल्याणासाठीं. खरीच फितुरी असती, गुन्हेगार सुटला असता, तर दौलतीला धोका नसता का आला ? आपण निर्दोषी ठराल तर आपल्याला आनंद होईल, असं नाहीं का त्यांनीं म्हटलं ? धनी ! धनी ! दैवाची नजर फिरली तर देवाचा दगड होतो–मग आपण तर हाडामांसाचीं माणसं ! आज अंधार आहे, चार दिवस काढूं. केव्हां तरी सूर्य उगवेलच उगवेल.

**हिरोजी**—शेतावर दिवस काढायला लढवय्या शिपायाला सांगतेस ? हाताच्या अंतरावर लढाईचं मैदान दिसत असतांना–बैलासारखा नांगर हांकीत बसूं ? वैऱ्याची गर्दन तोडणाऱ्या या समशेरीच्या हातांत विळा घेऊन नुसता कडबा कापीत बसूं ?

**गजरा**—आल्या भोक्तृत्वाला मान वांकवावी लागते. लढाईच्या मैदानावर देशाचं दैव नांगरणारा शिपाई कधींना कधीं तरी शेतीवर यायचाच.

**हिरोजी**—कधींना कधीं म्हणजे केव्हां, म्हातारा झाल्यावर ना ? म्यानांत अडकून पडलेली समशेर कचकन् बाहेर काढण्याइतकी माझ्या मनगटाची ताकद काळाच्या पकडींत सांपडली आहे का ? लाथेच्या ठोकरीनं हजार दुस्मानांचीं कंबरडीं मोडण्याची ताकद ज्या पायांत आहे, त्या पायांनीं

काय ढेकळं तुडवीत बसूं ? सेनापतीच्या तोंडचा नुसता हुंकार ऐकतांच विजेच्या कडकडाटानें ‘ हरहर महादेव ’ ची आरोळी ठोकणाऱ्या तोंडानें काय इरीरी, पोपो, ह्या ह्या म्हणत बसूं ? काय म्हणून ?

**गजरा**—प्राक्तनाच्या देवतेनं पळवाट काढली ह्मणून.

**हिरोजी**—कुठलं आणलं आहेस प्राक्तन ? प्राक्तन मी जाणत नाहीं. मराठेशाहीच्या सेवेंतून प्राक्तनानं मला दूर केलं, असं तुला वाटत असेल तर तूं खुशाल ह्मण. मला कुणीं दूर केलं त्याची आठवण माझ्या डोळ्यां-समोर रसरसते आहे. ती त्या बाजीची मग्रूर मुद्रा, तो उर्मट आवाज, अधिकाराच्या कैफानें धुंद झालेली त्याची ती जहरी नजर, या डोळ्यांसमोरून हलत नाहीं. उभारलेल्या फणेवर लाथ मारतांच त्वेषानं चिडलेल्या सर्पाच्या फुत्कारासारखे ते विषारी उद्गार अजून या कानांत दुमदुमत आहेत. त्यांची आठवण होतांच देहांतील प्रत्येक नस, प्रत्येक रोम, चालत्या जिवाच्या नाडीचा प्रत्येक ठोकान् ठोका एकच साद देतो आहे कीं हिरोजी, या अन्यायाचा सूड घे.

**गजरा**—देवाची दया असली तर सूडाची वाट शेतमळ्यावरूनच नाहीं का दिसणार ? दुस्मानांच्या चाकरींत देह विटाळून मिळालेल्या सुडानं स्वतःच्या घरीं सुख लागेल असं वाटतं तरी कसं आपल्याला ? वाटेकडे डोळे लावून बसलें आणि कुणीं विचारलं तर घरचे घरधनी शिद्द्याच्या छावणींतून जातभाईच्या माना कापताहेत ह्मणून का उत्तर देऊं ?

**हिरोजी**—दे—काय वाटेल तें उत्तर दे; मला त्याची पर्वा नाहीं. बाहेर जंग पडले असतां कवाड लावून घरीं बसणं शिपायाच्या जिण्याला शोभत नाहीं. ह्मणूनच मी लढाईवर जाणार आणि मराठ्यांकडून लढाईला वाव नाहीं तर मुसलमानांकडून लढणार; पण माझा सूड मी पुरा करणार.

**गजरा**—ह्मणजे ? शिद्दी जोहाराच्या बाजूनं लढतांना पाठचा मराठा-मराठा भाऊ समशेर घेऊन पुढं आला, तर आपण त्याची गर्दन उडवणार, असंचना ?

**हिरोजी**—लढाईच्या मैदानावर नात्यागोत्याचा बडिवार नाहीं. शिवाजी महाराजांनींच मोऱ्यावर नाहीं का शस्त्र चालवलं ?

**गजरा**—त्यांनीं शस्त्र चालवलं तें मराठेशाहीसाठीं. दुस्मानांच्या तरफदारीनं भाऊबंदांचे गळे कापण्यासाठीं नव्हे कीं खासगी सूड घेण्यासाठींही नव्हे.

[ वार लागलेला अरबी वेषधारी खेळोजी धांवत धांवत प्रवेश करतो.

**खेळोजी**—संकटांत सांपडलेल्या या मरत्या मराठ्याला आसरा द्या

**हिरोजी**—तूं-तूं मराठा ? तूं तर मुसलमान दिसतोस.

**खेळोजी**—वैऱ्यांच्या गोटांत शिरणाऱ्या कोंकराला लांडग्याचं कातडं पांघरावं लागतं. वैरी जवळ आले. देवाची ग्वाही घालून हात जोडतों, घटकाभर मला कुठंतरी लपवून ठेवा.

**गजरा**—या, असे माझ्याबरोबर त्या गवताच्या गंजीजवळ !—कुणीं आले तर त्यांना दुसरी वाट दाखवावी झटलं. [ खेळोजीला घेऊन जाते. ]

**हिरोजी**—वैऱ्याच्या गोटांत शिरणाऱ्या कोंकराला लांडग्याचं कातडं पांघरावं लागतं. खरं आहे. मलाही आतां लांडग्याचंच कातडं पांघरलं पाहिजे. हेराच्या कामगिरीसाठी चढवावा लागणारा वैऱ्याचा वेष नोकरीच्या पेशासाठीं चढवला तर त्यांत फरक कसला ? [ कासम व हासम प्रवेश करतात. ]

**कासम**—अबे सूवरके बच्चे ! या रस्त्यानं एक जखमी अरब जातांना दिसला तुला ?

**हिरोजी**—कमरेशीं तरवार नाहीं; नाहींतर याचं उत्तर निराळ्या भाषेंत एकवलं असतं तुला.

**हासम**—म्हणूनच विचारतों, सीधा जबाब दे. पाहिलास का एक अरब ?

**हिरोजी**—अरबाचा पाठलाग तुम्ही कां करितां ? तुमचा भाऊबंदच ना तो ?

**कासम**—भाऊबंदांतही भाऊबंदकी असते. मराठे नाहींत मराठ्यांच्या मुंड्या मुरगाळीत ?

**हिरोजी**—खरं आहे. एक अरब दिसला, जखमीही दिसला; पण तो मला मराठ्याला पहातांच इथनं हुसकला तो त्या पलिकडच्या जंगलाकडे गेला.

**हासम**—सच बात ? पहा, झूट ठरलं तर परत येऊन मुंडी छाटीन.

**हिरोजी**—अगदीं सच बात. खोटं सांगून मला काय मिळणार ?

**कासम**—कोणत्या बाजूला गेला ह्मणालास ?

**हिरोजी**—या समोरच्या झाडींत शिरून पाहातां पाहातां दिसेनासा झाला.

**हासम**—चलो–चलो–वह तरफ. [ दोघे जातात ]

**हिरोजी**—काय केलं मीं हें ? मुसलमानांची चाकरी पत्करण्यासाठी निघालों आणि पहिल्याच क्षणीं इमानाला आडवा आलों. काय करतो आहे मी ? मराठ्याचा बाणा विसरून आतां नुसता एक मुडाचा विचार कायम ठेवला पाहिजे. देशाची जाणीव विसरून पेशाची आठवण पुढें केली पाहिजे. नाहीं !—मनाला हबका देऊन चालायचं नाहीं. परक्याच्या चाकरीचा रुपेरी लंगर पेहेरण्यासही इमानाच्या भाकरीचा लोखंडी लंगर ताडकन् तोडून टाकला पाहिजे.

[ खेळोजीला घेऊन गजरा येते. ]

**खेळोजी**—( मूर्च्छित पडतां पडतां ) हिरोजी ! मला ओळखलं नाहींस

**हिरोजी**—ओळख मागाहून, पण आधीं तुला जखम कुठं लागली आहे पाहूं ? [ त्याला मांडीवर घेतो ]

**खेळोजी**—आतां जखम कसली पहातोस ? माझं आयुष्य संपलं. मी आतां एका क्षणाचा सोबती आहे. तूं भेटलास. बरं झालं. पृथ्वीमोलाची कामगिरी हातीं सांपडून दौलतीवरचं अरिष्ट आतां दूर होईल. असाच जा आणि बाजीप्रभूला सांग—

**हिरोजी**—[ त्याला ताडकन् खालीं टाकून ] बाजीप्रभू ? नाहीं—प्राण गेला तरी बाजीप्रभूचं तोंड पुन्हां पाहणार नाहीं.

**खेळोजी**—ऐक, हिरोजी ऐक. वेळ आणीबाणीची आहे. आपल्याच घरीं आपलींच माणसं वैरी झालीं आहेत.

**हिरोजी**—आतां त्यांतलाच मी एक आहें असं समज.

**खेळोजी**—मराठा कुळींच्या पाठच्या बहिणी ! तूं तरी एवढी कामगिरी कर. महाराजांची हालचाल कुणा औरतेनं दुष्मानाला कळविली आहे आणि महाराजांना घेरण्याला शिद्दी आतां पन्हाळ्याला येणार आहे. कुणी तरी एवढी बातमी बाजींना सांगतों म्हणा म्हणजे मी सुखानं मरेन.

**गजरा**—मी सांगेन; कांहीं काळजी करूं नका. मी सांगेन.

**खेळोजी**—माझा...शेवटचा...मुजरा....महाराजांपायीं....रुजू......करा. आई......भवानी...[ मरतो ]

**गजरा**—दौलतीची सेवा करतांना एका मराठ्याचा आत्मा आई भवानीच्या पायांशीं निघून गेला. असलं भाग्याचं मरण टाकून आपण परक्यांचे पाय पकडणार ?

**हिरोजी**—कसलं हें भाग्याचं मरण ? पायाचे पाईक कुत्र्याच्या मौतीनं मरत असतांना सुभ्याचे सरदार गादीतक्क्यावर लोळत पडले आहेत. हें भाग्याचं मरण, कीं तें भाग्याचं जिणं ? गजरा माझ्या निश्चयाच्या आड येऊं नकोस.

**गजरा**—ते पहा, धनी–ते पहा, मघांचे मुसलमान पुनः इकडेसच येत आहेत. त्यांनीं जर पाहिलं—

**हिरोजी**—खुशाल पाहूं दे त्यांना, आतां तेच माझे भाई. तुला भीती वाटत असेल तर तूं दूर रहा; पण मी आतां इथून एक तसूभरही ढळणार नाही. [ ती बाजूला होते. कासम हासम येतात. ]

**कासम**—क्यों बे बदमाष ! आमच्या डोळ्यांत धूळ टाकतोस

**हिरोजी**—गुन्हा झाला खरा. पण तो गैरसमजानं झाला. मुसलमानाला वांचवण्यासाठीं झाला.

**हासम**—हा मुसलमान नाही हें तुला कळलं

**हिरोजी**—कळलं, अगदी चांगलं कळलं ! म्हणूनच माझे डोळे उघडले.

**कासम**—उघड्या डोळ्यांनीं जीव जात नाही म्हणून या मुर्दाडानं डोळे मिटले. आतां उघड्या डोळ्यांनीं तूं काय करणार आहेस ? कीं तूंहि डोळे मिटणार याच्यासारखे.

**हिरोजी**—चांगले डोळे उघडे ठेवून आतां शिद्दी जौहरची फौज गांठणार आहे. हेरांचं जिणं म्हणजे कुत्र्याची मौत. हातावर शिर घेऊन कामगिरीला निघावं, केव्हां फटके खायला तयार व्हावं, तर केव्हां असं कुत्र्याच्या मौतीनं मरावं. त्यापेक्षां सलाबतजंगाच्या शिकारखान्यांतलं जनावर झालेलं फार बरं. अब्रू तर सलामत राहील. मेहेरबान, मीही असा एक हेर होतों–असाच एक दिवस कुत्र्याच्या मौतीनं मरणार होतों. [ खेळोजीचं प्रेत बाजूला ओढून टाकतो ]

जा, असाच पडून रहा. देईल तुला कुणी मूठमाती.

**कासम**—नाहींतर होईल कुत्र्यालांडग्यांची मेजवानी.

**हिरोजी**—माझीही अशीच गत झाली असती. मुसलमानी सांडसाच्या शिळेवरून मला खालीं उतरवलं नसतं तर—

**कासम**—इनशाल्ला ! तुझं नांव हिरोजी नाईक ?

**हिरोजी**—होय ! तुम्हाला कसं कळलं ?

**कासम**—कसं का कळेना ? तूं हिरोजी असलास तर आमच्या फौजेची दारं तुला मोकळीं आहेत. बाजीप्रभूनं तुला केलेल्या सजेचा मुकाबला आम्हांला मालूम झाला आहे आणि तुझा दिल लागत असेल तर अवघडी आमच्यासाथ तुला आम्ही घेऊन जाऊं.

**हिरोजी**—पण माझी बायको—गजरा—गजरा—

**हासम**—वारे मेरे यार !—तुझ्या साथ औरत आहे—तर चलच मग आमच्याबरोबर.

**हिरोजी**—गजरा—गजरा—कुठं गेली ही ?

**हासम**—वह देख ! वह देख !—बिजलीसारखी दौड करते आहे.

**कासम**—दौडो ! पकडो ! पन्हाळगडावरच्या हल्ल्याची बात ती दुष्मनाच्या कानीं घालील.

**हिरोजी**—गजरा-गजरा-थांब. [ जाऊं लागतो ]

**कासम**—हासम, तूं ह्या हिरोजीबरोबर त्या औरतीला पकडायला धांव, तोंवर मी शिद्दीजौहरला शिवाजी पन्हाळ्यावरच आहे हें सांगून अगदीं जलदीनं हल्ला आणवतों.

[ तेही त्याच्यामागं " दौडो पकडो " म्हणत जातात. ]

# प्रवेश ३ रा

[ स्थळ—सरकारवाडा ] बाजीप्रभू बेचैन येरझारा घालीत आहेत.

**बाजी**—बादशहाच्या दरबारी तख्ताची कसम खाऊन रणमस्त शिद्दी जौहर पंधरा हजार फौजेच्या भक्कम बळानं शिवाजीराजांवर चाल करून येत आहे. बापाच्या कत्तलीचा बदला घेण्यासाठीं सुडाला पेटलेल्या फाजल महंमद-सारख्या बेफाम जवानमर्दाची त्याला जोड मिळालेली आहे आणि हें इस्लामी अरिष्ट आमच्या कोणत्या किल्लेकोटावर आधीं टक्कर देणार ह्याचा कयास मात्र अद्याप बरोबर लागत नाहीं. जिवाला कसं जिवाभारी संकट पडलं आहे. इथं—ह्या पन्हाळगडीं, अशा बेमजबूत किल्ल्यावर राजे बेचैन तर तिकडे विशाळगडीं कच्च्या शिबंदींत राजमाता जिजामातुश्री फिकिरीत. तशांत दुष्मनांच्या हातीं राजांच्या हालचालींची खडान्‌खडा खबर हिरोजीकडून पडलेली. वर खासा स्वाऱ्यांनी न्यारीच मसलत करून अवचितगड सोडावा ह्मटलं तर वैऱ्यांनीं गडा-बाहेरही फितुरीचे पाश पसरून ठेवले असतील, असा बेचैन मनाला संशय येतो आणि वैऱ्यांच्या हालचालींची खबर जलदीनं मिळावी ह्मणून हेरांच्या वाटेकडे डोळे कसे आशाळभूतपणानं लागतात. जबाबदारीची जाणीव दुबळ्या जिवाला देखील जोम देते खरी; पण कर्तबगारीची करडी वेळ कसलेल्या हिंमतमर्दालाहि बेदिल करून सोडते. [ अनाजी येतो ] काय खबर आहे अनाजी? शिद्दयाची फौज कोणत्या रोखानं चाल करून जाते आहे कांहीं खबर मिळाली का?

**अनाजी**—नाहीं सरदार! चौवाटा हेर धाडले पण कुठूनही खबर नाहीं.

**बाजी**—बहिर्जी नाईकाचा पक्का शागीर्द—गोफणीच्या दगडागत अचुक नेम साधणारा खेळोजीसारखा हेर धाडूनही खबर नाहीं म्हणतां? अचंबा वाटतो. [ किंचित वेळ विचार करून ] छे! अनाजी, हेरांच्या या दिरंगाईनं घोर अधिकच दुणावत चालला. शिद्दी जौहरचा एकाएकीं ह्या पन्हाळ्यावर हल्ला आला आणि जर कां गड वेढला गेला, तर राजांना इथून वेढ्यापार होणं मुष्कील होईल. बाहे-रची रसद बंद पडून मराठ्यांना दुष्मनाच्या पुढं उपासपोटीं माना झुकवाव्या लागतील. महाराष्ट्रांत हाहाःकार उडेल.

**अनाजी**—पण राजांनी नाहीं का याच्यावर कांहीं मसलत रचली?

**बाजी**—काय सांगावं ? अनाजी, राजे अशा भयंकर वादळांतही बेगुमानपणं दर्यागत गंभीर दिसत आहेत. बळेंच धीर करून कोसळत्या अरिष्टाची आह्मीं त्यांना सांगोपांग जाणीव दिली; पण त्यांचं एकच उत्तर. ' जिथं शिवाजी तिथं वैऱ्याच्या फौजेचा हल्ला येणार. आह्मीं इथं पन्हाळगडीं आहोंत तर इथंच शिद्दीचा हल्ला होऊं द्या. त्यामुळं विशाळगडीं जिजामातुश्री सुखरूप रहातील आणि आह्मी शिद्दी जौहरला पाहून घेऊं. '

**अनाजी**—मातोश्रींच्या रक्षणापायीं शिद्दी जोहरला बळेंच आंगावर घेण्याचा महाराजांचा मनसुबा असेल, तर अशा बेमजबूत किल्यांत कोंडून पडण्यापेक्षां उघड्या मैदानांत झुंज देणं चांगलं नव्हे का ?

**बाजी**—नाही अनाजी, शिद्दीचा अरबी रिसाला आणि पायदळाची हत्यारबंदी इतकी जंगी आहे की, त्यांच्यापुढं भिमथडी तट्टांचा आणि डोंगरी मावळगड्यांचा उघड्या मैदानावर जराही टिकाव लागणार नाही. मुसलमानांच्या जंगी फौजेचा डोंगरदरडींनं गनिमी कावे खेळूनच आपल्याला पाडाव केला पाहिजे. पण शिवप्रभूंचा मनसुबा कांहीं कळत नाही. ते सारखी हेरांची चौकशी करीत आहेत. आणि हेरांना बेअंदाज दिरंगाई लागते आहे !

**अनाजी**—सरदारसाहेब, अशा वेळां मात्र हिरोजीची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं.

**बाजी**—हिरोजी ! हिरोजी ! काय केलंस हें ! आपल्यापेक्षां अधिक बलवान दुस्मानाशीं झुंज देतांना समोरासमोर झुंज घेणं मुष्कील होतं ह्मणून वैऱ्यांशीं गनिमी काव्यानं झुंजावं लागतं. गनिमी काव्यानं झुंज द्यायची तर हेरांकडून शत्रूच्या हालचालींची खडान्‌खडा खबर मिळवावी लागते आणि सांप्रत तशाच झुंजेची गर्दी उडाली असतां हिरोजीसारखा शिकंदर हेर आह्मांला पारखा झाला. काय सांगावं, अनाजी, हिरोजी फितुर नाहीं अशी कोणी बालंबाल खात्री देईल, तर त्यानं आह्माला संतापानं दिलेलीं दुरुत्तरं विसरूनही हा बाजी त्याला मोठ्या दिलसफाईनं मराठेशाहीत घेऊन येईल. अशी कर्तबगार माणसं वेळवखतावर पाठ फिरवूं लागलीं म्हणजे आतांप्रमाणं शत्रूंची भीति वाटून उरांत धडकी भरते. शकुनाची खूणगांठ ढिली पडते, बुद्धीची पाऊलवाट ठेंचाळूं लागते. दाराशीं दावेदार यावा आणि पोटचा पोर मरून जावा, अशी मनाची अवस्था होते. हिरोजीला

हद्दपार करतांना तो फितूरच आहे अशी माझी बालंबाल खातरजमा झाली होती असं मुळींच नाहीं. तरीपण ज्याचा संशय आला त्याला दौलतीला धोका येणार नाहीं इतक्या दूर धाडावा; मग त्यांत व्यक्तीचा अन्याय झालेला परवडेल पण दौलतीला धोका येतां कामा नये, ह्या दौलतीच्या शिस्तीला धरून त्याला हद्दपार करावाच लागला. [ पडद्यांत " सावध व्हा–म्हणून सरदार–सावध व्हा " ] अरे ! ही कोण सावध व्हा म्हणून ओरडते ? असं झालं तरी काय ? [ गजरा येते ]

**गजरा**—सरदार, सावध–स्वतः सावध व्हा आणि शिद्दीच्या फौजेचा हल्ला अगदीं जवळ आला म्हणून महाराजांना आधीं सावध करा. [ गजरा ओरडत आहे तोंच चोंहीकडून घाबरून मावळे व शिवाजीमहाराज येतात ]

**शिवाजी**—कोण शिद्दीचा हल्ला आला म्हणून ओरडत आहे—

**गजरा**—मायबाप ! ही एक गरीब शिपायाची घरधनीण ओरडते आहे कीं, आपल्या वैऱ्यांचा हल्ला अगदीं जवळ आला. सावध व्हा. दगा होईल !

**शिवाजी**—पोटीं हिंदूपदपादशाहीचा मनोरथ आणि ओठीं जगदंबा मायभवानीचं नांव असतां सावध शिवाजीला दग्याची बाधा होईल कशी ? कुणाच्या सांगण्यानं तूं आम्हांला सावध करायला आलीस ?

**गजरा**—शिद्दीच्या फौजेंत त्याच्या हल्ल्याची खबर काढायला गेलेला आपला खेळोजी नांवाचा हेर मार्गीं मुसलमानांच्या बाणाला बळी पडला.—

**बाजी**—काय खेळोजी मारला गेला ?

**गजरा**—होय सरदार ! वैऱ्यांनीं त्याचा पाठलाग केला, खेळोजीनं शिकस्त केली; पण दोघांपुढं एकाचं कांहीं चाललं नाहीं. अखेर शिवरायांचं स्मरण करून त्यानं प्राण सोडला; पण मरतां मरतां या अभागिनजवळ त्यानं आपणांसाठीं सांगावा दिला.

**शिवाजी**—काय सांगावा दिला ?

**गजरा**—कुणा फितव्यानं शिद्दीला खबर दिली कीं शिवाजीराजे पन्हाळगडींच आहेत.

**बाजी**—काय ? ही बातमीही शिद्दीला समजली ?

**गजरा**—होय, समजली सरदार. इतकंच नाहीं तर विशाळगडच्या रोखानं

चाललेले घोडेस्वार एकाएकीं फिरून या पन्हाळ्याकडे वळले आहेत. म्हणून म्हणतें, मराठ्यांचे मायबाप ! सावध व्हा ! नाहीतर दगा होईल.

**शिवाजी**—मराठ्याच्या शूर मुली ! महाराष्ट्रांत तुझ्यासारख्या गरीबांच्या गृहलक्ष्मीसुद्धां जिथं दौलतीपायीं आपल्या कायेची कुरवंडी करायला धांवल्या तिथं दगा होऊन शिवाजीला राजलक्ष्मी अंतर देईल अशी बिलकुल शंका नको. तरी पण बाजी प्रभू, आतां गाफिल राहण्यांत अर्थ नाही.

**बाजी**—नाहीं हुजूर. कोण आहे रे ? [ शिपाई येतो ] जलदीनं शिंग फुंकून फौजेला सावध करा. बुरजोबुरजीं तोफांशीं दारुगोळ्याच्या ढिग्या ठेवा. भालाबर्चीवाल्यांना कंबर कसून असं द्या. [ शिपाई जातो ] अनाजी, आधीं विजापूर आणि विशाळगड दोन्ही वाटांना टेहळे धाडून ठेवा. जागोजाग आघाडीला सांडणीस्वार लावा. घडीभराच्या आंत खाशांना येथून हालायचं आहे हें ध्यानीं राखा. [ अनाजी जातो. ] हुजूरनीं चिलखत चढवावं. तोवर मी घोड्यांची वर्दी देतो आणि शेंपन्नास शेलक्या मावळ्यांना बरोबर घेतों. [ बाजी जाऊं लागतो तोंच पहारेकरी येतो. ]

**शिपाई**—विशाळगडाहून मातोश्रींचा तांतडीचा निरोप घेऊन सांडणीस्वार दौडत आला आहे आणि जलदीनं महाराजांचं दर्शन मागतो आहे.

**शिवाजी**—जा, जा येऊं दे त्याला आंत.

**सांडणीस्वार**—[ धांवत येऊन ] आला, हुजूर, शिद्दीच्या फौजेचा हल्ला अगदीं जवळ आला. मातोश्रींचा निरोप घेऊन विशाळगडावरून दौडत येत असतां माझ्या पाठोपाठ पठाणांचा रिसाला दौडतांना दिसला. आतां इतक्यांत गड घेरला जाईल, हुजूर. [ तोफेचा आवाज ]

**बाजी**—अरेरे ! शेवटीं दुष्मनांनीं अवचित दावा साधला. तोफांचा भडीमार सुरू केला. लढाईला तोंड लागलं.

**शिवाजी**—वारे शिद्दी जौहर ! वख्त तर बांका आणलास ! एकूण दुष्मनांच्या हल्ल्याआधीं पन्हाळ्याच्या बाहेर पडून त्यांच्याच पाठी-

वर चोप देण्याची आमची मसलत अशी अविश्वाच फजूल ठरून उलट आह्मींच बेमजबूत किल्ल्यांत वेढलों गेलों ह्मणायचे.

**बाजी**—फिकीर नाहीं. हुजूर, आह्मां मराठ्यांवर असे कित्येक गळचेपीचे बांके वखत गुदरून गेले आहेत. अशा कृतांत काळाच्या जबड्यांतून मराठेशाहीचे झेंडे आह्मीं मावळ्यागड्यांनीं सहीसलामत दख्खनभर नाचवले आहेत. मस्तकीं माय भवानीची सांवली, समरांत रणदेवतेची स्फूर्ति आणि प्रसंगीं शिवप्रभूंची कल्पनाशक्ति अशा या त्रिविध पुण्यशक्तींची बलवान् जोड मिळाल्यावर मुखानं हरहर महादेवचा जयघोष करीत कोणता मराठा समरांगणीं उडी घेणार नाहीं ? [ तरवार उपसून धांवतो ).

**शिवाजी**—थांबा ! बाजीराव थांबा ! रणवाद्यांच्या दणदणाटानं बाहू असे स्फुरण पावूं देऊं नका. तोफांच्या गडगडाटानं हृदयांत अधम वीरश्रीच्या उसळ्या येऊं देऊं नका. झुंज शिद्दी जौहरशी, गड बेमजबूत, वैऱ्याशीं समारासमोर तग लागणं मुष्किल आहे.

**बाजी**—मग झुंजेविना, महाराज, हा दुष्मनांनी केलेला कोंडमारा कसा मोडून काढूं ? शिवप्रभूसारखा हा महाराष्ट्राचा पंचप्राण वैऱ्यांच्या गळचेपींतून कसा सोडवूं ? जिजामातोश्रींनीं विशाळगडीं जातांना " बाजी, शिवबासारखा आमचा कुशीचा गोळा परत भेटीला विशाळगडीं आमच्या सुपूर्द करा " असं सांगितलं, त्यांना तोंड कसं दाखवूं ?

**शिवाजी**—बाजीराव ! समरांत धुरंधरांनाहि भारी असे मर्द तुह्मीं, आह्मांपायीं अशीं आसवं ढाळूं लागलांत, कीं आह्मांउरीं गहिंवर येतो. कंठ दाटून शब्द उमटेनासा होतो. भाग्य आमचं आणि अवघ्या महाराष्ट्राचं—किंबहुना सर्व हिंदवासियांचं भाग्य इतकं उज्ज्वल कीं, राजांच्या उरींहि कृतज्ञतेनं गहिंवर दाटावा असे थोर दिलाचे तुह्मीं सरदार आमच्या दौलतीला लाभलांत. बाजीराव ! तुह्मांगत रणझुंझारांना आमच्या भोंवतीं, शिर तळहातावर घेऊन वीरश्रीच्या डरकांळ्या फोडतांना पाहिलं, अंतःकरणाच्या मायेनं आसवं ढाळतांना पाहिलं कीं, वैऱ्याची

कदर वाटेनाशी होते. मी करीन ती पूर्व अशी घमेंड अंतर्यामीं वाटूं लागते. शिद्दीच्या सहस्रावधी फौजेच्या वेढ्यांतून अक्कलमंदीच्या बळावर हूं हूं म्हणतां वेढापार होऊं अशी हिंमत चढते ?

**बाजी**—धनी ! वैऱ्यांनी चौफेर घेरलं. तटावरून दुष्मानांच्या स्वारशिबंदीवर नजर टाकली तर दर्यांत वाट चुकलेल्या गलबतागत गड वाटून अक्कल काम करणार नाहीं-तिथं अक्कलमंदीनं सुटका कशी व्हावी ?

**शिवाजी**—मनीं शुभ मनीषा असतांना मायभवानी युक्तीची वाण कधींही पडूं देणार नाहीं. आल्या प्रसंगांतून अक्कलमंदीच्याच जोरावर खात्रीनं आपण वेढा पार होऊं. मात्र तुमच्या पथकांतला हिरोजी नांवाचा तेवढा हेर मात्र आमच्यासमोर दाखल करा.

**बाजी**--हिरोजी ?

**शिवाजी**--होय हिरोजीच ! [ बाजी दीर्घश्वास सोडतो ] कां-असे स्तंभित कां होतां ?

**बाजी**--हिरोजीला फितुरीच्या संशयावरून मी हद्दपार केला. तो गडापार झाला आहे सरकार.

**शिवाजी**—काय सांगतां बाजी ! हिरोजी सध्यां चाकरींत नाहीं ? अरेरे ! वाईट झालं ! आतां मात्र संकटांतून मुक्त होणं बेअंदाज मुष्कील झालं आहे. दैव कसं क्षणाक्षणाच्या अंतरानं आशेनिराशेवर तरंगत आहे. बाजी, हिरोजीला दिलेली सजा तुह्मीं न्याय्यच दिली असाल-त्यांत बेभरंवसा खचित नाहीं. पण सजा फर्मावणारे आह्मीं असतों तर हिरोजी दिसण्यांत आह्मांगत दिसतो, याचा वेळवखतीं उपयोग होईल हें ध्यानी घेऊन त्याला हद्दपारी न देतां कैदखान्याची सजा फर्मावली असती. असो. झाली गोष्ट होऊन गेली. गड आतां असाच झुंजता राखा. मिळण्याचा अंदाज असल्यास हिरोजीला परत मिळवा, नाहींपेक्षां भगवंताची इच्छा आणि सर्वांचं दैव. [ जातो ]

**बाजी**—हिरोजीला परत मिळवा ! आज हिरोजीच्या परत येण्यावर सर्वांचं दैव लटकलं अं ? " आम्ही सजा फर्माविणार असतों तर हिरोजीला कैदखान्याची सजा दिली असती " असं महाराज म्हणाले. या बाजीला तें कांहीं साधलें नाहीं. दिसण्यांत नेताजी पालकर महाराजांसारखा, तेव्हां नेताजीलाच खोटा ..वाजी करून महाराज जसं कधीं कधीं राजकारण साधतात तसाच हिरोजीचा उपयोग होइल, हें तरी हिरोजीला सजा फर्मावितांना आमच्या ध्यानीं यायचं होतं ! पण या बाजीला कांहीं तेवढं धोरण राहिलं नाहीं आणि याचाच परिणाम धन्यांची वैऱ्याच्या वेढ्यांतून सुटका न होण्यांत होणार ! नको, नको, हें मंदबुद्धि जिणं. बाजी समर-धुरंधर खरा; पण मुत्सद्देगिरींत हरला. लोकसंग्रहाची बुद्धी-गरजेवर गुन्हेगारांचाही उपयोग करून घेण्याची युक्ती या बाजीला सुचली नाहीं आणि मनीं नसतांही बाजीच अखेर महाराजांच्या मसलतीच्या आड आल्यागत झाला. नाहीं, हें सहन होत नाहीं मनाला. बेहत्तर आहे जीवाजिंदगी गेली तर ! आतां आधीं गजराच्या सहाय्यानं हिरोजीला गडावर दाखल करीन; तरच नांवाचा बाजी प्रभू.

[ पडदा पडतो ]

**अंक २ रा समाप्त.**

# अंक ३ रा

## प्रवेश १ ला

[ पन्हाळ्याखालील शिद्दीच्या छावणीपैकीं एक चौकी, शिपाई नाचरंग करीत आहेत. ]

**कासम**—बस्–बस्–आपला तर कलेजा थंड होऊन गेला बुवा ! ह्या करवीर मुलखीं इतक्या अस्सल चिजा म्हणणाऱ्या पऱ्या असतील हें आपल्याला बिलकूल मालुम नव्हतं.

**हासम**—अरे मेरे यार ! तुला काय वाटतं ? मराठे म्हणजे काय अगदीं पागल आहेत ? अरे या मराठ्यांना गाण्याची कदर असते म्हणून तर दिल्लीच्या अस्सल गवय्या इकडे येऊन गबर होतात. हायरे मेरी परीजान, अभी असा गज्जल होऊं दे–की यंव ! अगदीं आदेके साथ ! [ परीजान आदा करून गाणं म्हणते. ] माषाल्ला ! क्या गाना ! सुभान अल्ला ! सुभान अल्ला ! ! कासमभाई, फाजलसाहेबांना म्हणावं, वेढा लवकर उठवूं नका ! आपण तर बुवा या पन्हाळ्याशेजारींच मुक्काम देणार ! विजापुरीं काय आहे ? अशी कैक विजापुरं या करवीरावरून कुर्बान करावीं ! परीजान ! अभी और एक होने दो ! [ परीजान गाऊं लागते. ]

**शिपाई**—[ धांवत प्रवेश करतो ] जमादारसाहेब ! दगा ! दगा ! ! त्या पलीकडच्या बुरजावरून एक बडी मोठी रश्शी खालीं आली आणि त्यावरून कुणी दुष्मन् खालीं उतरताहेत.

**हासम**—मर्द आहेत कीं औरता आहेत रे ?

**शिपाई**—तें या काळोखांत कसं समजेल जमादारसाहेब ?

**कासम**—अबे पागल ! ऊठ, जलदी कर ! औरत कसल्या घेऊन बसला आहेस ? गनीम वरून उतरतील तर या पहारेचौकीचा धुव्वा उडवून देतील. छावणींत शिद्दीकडे खबर धाडायलाही आदमी उरायचा नाहीं.

**हासम**—नाहीं, नाहीं, हें माषुक हत्यार जवळ आहे तोंवर आपण एक तसूभरही हालणार नाहीं. मराठ्यांना म्हणावं खुशाल या–या परीच्या गळ्यांत

असा हात घालून बसतों—खुशाल माझी गर्दन उडवा—अहाहा ! दिल परेशान होऊन जाईल.

**कासम**—हा पागल बेभान आहे. पुढं हो, आणखी चार शिपायांना हांका मारून आवाज न देतां बुरजाकडे चल. खराच कांहीं भारी दगा असेल तर आधी नौबतीनं छावणी हुषार केली पाहिजे. [ जातात ]

**हासम**—परीजान, अभी फेरसे होऊं दे मघांचा गझल. [ गझल चालू असतांना कासम व शिपाई पुरुषवेषधारी गजरेला घेऊन येतात. ] या अल्ला, मर्द ! अरे, औरत कां नाहीं पकडून आणलीस ?

**कासम**—औरत रहने दो. चला रे तुम्ही आपल्या कामावर—आणि या परी-जानलाही गांवांत पोहोंचवून द्या. [ शिपाई वगैरे जातात ] कोण रे तूं ?

**गजरा**—मराठा.

**हासम**—वाःरे मेरे यार ! काय आवाज. साऱ्याच मराठ्यांचे आवाज असे नाजनी असतात का रे ?

**कासम**—सीधी बात बोल. काय करीत होतास तिथं ?

**गजरा**—दोरावरून उतरत होतों.

**कासम**—दोरावरून मागं फिरला तो कोण ?

**गजरा**—तटावर जाऊन पहा !

**हासम**—अबे मग्रूर ! कुणाला हा जाब देतोस ?

**गजरा**—कामगिरीच्या वेळीं नाचरंग तमाशे करीत बसलेल्या तुम्हां नादानांना हा जबाब देतों आहें.

**हासम**—देख, भाई देख, आमची कामं हा पोर आम्हांला शिकवतो आहे. हा औरत भी नाहीं ! अबे लवंडे, जादा बात करशील तर मुंडीछाट करून टाकीन.

**कासम**—क्यौं बे छोकरे ! दोरीवरून मागं फिरला तो कोण ? बऱ्या बोलानं सगळी सीधी सीधी बात सांग ?

**हासम**—सबूर ! सबूर ! ! आपण आधीं त्याची झडती घेऊं. हे मरगहे असा सीधा जबाब नाहीं द्यायचे.

**कासम**—खेंच-खेंच त्याचे कपडे—आणि घे त्याची झडती.

**गजरा**—[ स्वगत ] आई ! अंबाबाई ! !–आतां तूंच माझी पाठीराखी. [ दोघेही तिला धरून कपडे काढूं लागतात. ]

**हासम**—या अल्ला ! परवरदिगार ! ये तो औरत ! क्यौं दोस्त ! कैसी कही ? कुक्की कशी बिनतोड निघाली ! मला वाटतं, हे सगळे मराठे हेराच्या कामगिरीवर औरताच पाठवतात. या खुदा, शिवाजीला गडावर सलामत कर–आणि आम्हांला अशाच औरता मिळूं देत.

**कासम**—क्यौं बे लवंडी ! कशासाठीं आमच्या छावणींत आलीस ?

**गजरा**—मी तुमची दुस्मान म्हणून आलें नाहीं; तुमच्या बऱ्याची बातमी सांगण्याकरितांच आलें आहे.

**कासम**—अशी फसवाफसवी करू पाहशील तर चाबकाखालीं फोडून काढीन.

**हासम**—अबे कासम ! औरतीबरोबर जोरानं काय बोलतोस ? परजािन, तूं कां आलीस इकडे ?

**गजरा**—हल्लीं तुमच्याकडे नवीनच नोकरीला राहिलेले हिरोजी नाईक आहेत ना ? त्यांना इथं घेऊन या म्हणजे सांगतें.

**हासम**—वाः ! म्हणजे त्यानंच तुला पळवून न्यावं ! इतका पागल नाहीं हं मी ! तूं माझी शिकार आहेस. तुला मी माझ्या राहुटींत घेऊन जाणार. बातमी-बितमी हम कुछ जानते नहीं. ही औरत आहे–माझ्या हातीं सांपडली आहे–माझी आहे–दुसरा कुणी हिच्यावर हक्क सांगेल तर मुडदा पाडीन त्याचा ! भाई बिई कुछ जाणणार नाही.

**कासम**—मोहिमेची तेढी वखत आणि तुला इष्काच्या गोष्टी सुचतात !

**हासम**—तूंच घेऊन बैस मोहीम. मी फाजलमहंमदचा साला मोहिमेवर आलों तों लढाईसाठीं नव्हे, औरतांसाठीं आलों आहे. तुला मरायचं असेल तर खुशाल मर मोहिमा करून. मी ही औरतच घेऊन जाणार. चलबे माषुक !

**गजरा**—जमादारसाहेब ! हिरोजी नाईकांना बोलावून आणा म्हणून मीं तुम्हांला सांगितलं ना ? त्यांना आणलंत तरच मी तुमच्या राहुटीकडे येईन.

**हासम**—हिरोजी गया जहान्नममें !–हा हातीं लागलेला फरमास माल सोडून पळत्याच्या पाठीं धांव मारण्याइतका मी पागल नाहीं. मराठ्याच्या छोकरीसमोर मराठ्या मर्दाला मी केव्हांही येऊं देणार नाहीं.

**गजरा**—जमादारसाहेब ! मराठ्यांच्या दग्याची बातमी मी सांगणार आहे. वेळ फुकट जाते आहे. मोलाची बात गमावून बसाल आणि मग पस्ता-व्यांत पडाल.

**कासम**—ठीक आहे, हासमभाई, हिला नीट पकडून ठेव. मी हिरोजीला घेऊन येतां. [ जातो ]

**हासम**—जा, जा.—अभी मेरी परीजान ! मी एकटा आहे माझा अर्ज ऐक. या मोहिमेच्या फंदफितुरींत पडूं नकोस. इष्काचा दर्द तुला माहीत नसला तर माझा गंडा बांध. तुला आषकमाषुकांच्या दिलजमाईचा अस्सल किस्ता मी देईन. पहा मी गुलिस्तां पढलो आहे. शिरीं फरहादचा किस्सा आणि लैला-मजनूनची कहाणी माझ्या दिलांत सांठवली आहे. माझ्यावर भरंवसा ठेव. दस्तकदम जोडून मी तुझ्या खिदमतीला हजर आहे.

**गजरा**—जमादारसाहेब, मोहिमेच्या धांदलीच्या वख्ती बेफायदा बोलण्यांत काय हंशील ! तुमच्यासारखे कदरदान शिपाई गडी पाहिले तर कुठल्या औरतेला आनंद होणार नाहीं ?

**हासम**—बस्–बस्–बस्–काम पूरा होगया. दिलसे दिल मिल गया. वारे मेरी दिलेजान ! वारे मेरे बुलबुल !!

**गजरा**—हं थांबा–दूर रहा–मला तुमच्याच छावणीत काम आहे. अगदीं तुमच्याच आसपास मला रहायचं आहे. मात्र इष्काच्या गोष्टी तुम्हीं इतक्यांत बोलतां कामा नये. मला जी कामगिरी करायची आहे ती पार पडली—

**हासम**—म्हणजे तूं माझी होशील असंच ना ? वारे मेरे प्यारी–मेरी दिलदार प्यारी–मेरे दिलकी दौलत–मेरे माषुक, तूं माझी हो. मी तुला माझ्या डोक्या-वर नाचवीन. [ हिरोजी, कासम येतात ] आईये ! दोस्त हिरोजी आईये ! यार, क्या कहूं ? ही पहा–ही पहा–खुदातालानं माझ्यासाठीं ही अस्मानूची परी गवा-वरून खालीं सोडून दिली.

**हिरोजी**—कोण ? गजरा ? माझी बायको !

**हासम**—तुझी बायको ! [ हंसतो ] तुझी बायको ? अरे तुझी बायको तुला पहातांच पळून जाते, हें आम्हीं आमच्या नजरेनं पाहिलं आहे. ही तुझी बायको असती तर तुला पहातांच पळत नसती का सुटली ? म्हणे बायको ! चार मैल पायपीट केली तर जी बायको तुझ्या हातीं लागली नाहीं, ती

काय गडाच्या दोरावरून उतरून तुझ्या पायाशीं चालून येणार आहे ? अरे, ही गुलशनची परी माझं नांव ऐकून, बेहोष मुडदा बनून माझ्याकडे आली आहे.

**हिरोजी**—ती कांहीं मुडदा बनून आली नाहीं; पण जीभ आटोपली नाहींस तर तुझा मात्र मुडदा पाडीन.

**हासम**—हां–खामोष ! ही माझी शिकार आहे. निमूट चालता हो. फार गडबड करशील तर शिवाजी ऐवजी तुझ्याशींच लढाई सुरू करीन.

**हिरोजी**—ठीक आहे तर–होऊन जाऊं या दोन हात. काढ तुझी समशेर म्यानांतून.

**कासम**—अरे भाई ! काय हा पागलपणा ! ती औरत आपल्याला फितुरीची बातमी देणार आहे ती आधीं काढून घेऊं आणि मग खुशाल तिच्या वांटणीसाठीं आपसांत लढून मरा. मला त्याची तमा नाहीं.

**हिरोजी**—गजरा, काय खबर आहे ! हें धाडस कां केलंस ? अशी भर रात्रीं गडाची भिंत उतरून कां आलीस ! [ गजरा डोळ्यानं खूण करते. ]

**हासम**—अरे पहा,–तिनं त्याला डोळा मारला. अबे पागल लवंडी, डोळा मारायचा तो मर्द पाहून मारावा. अशा या नादान मराठ्याला—

**हिरोजी**—गद्धेकी अवलाद ! थांब तुझा मुडदाच पाडला पाहिजे. [ हिरोजी त्याच्या अंगावर धांवून कट्यारीचा घाव घालतो. हासम जखमी होऊन पडतो. ]

**कासम**—पागल ! फाजल महंमदाच्या साल्यावर समशेरीचा वार ! तुझी मौतच आली म्हणून समज. कौन है उधर ? पठाण—[ पठाण येतात ] या मराठ्याला गिरफदार करून छावणींत घेऊन चला.

**हासम**—अरे कासमभाई ! ती काय औरत आहे तर छावणींत न्यायची ? मला आधीं उचलून जरा बाजूला ठेवा. आणि इथल्या इथंच या मराठ्याचा मुडदा पाहून तेवढी औरत माझ्या सुपुर्द करा रे. हा पहा मी बेशुद्ध झालों. [ शिपाई त्याला उचलून नेतात व परत येतात ]

**हिरोजी**—या कुणाकुणाला आपले मुडदे पाहून घ्यायचे असतील ते असे समोर या.

**कासम**—पहातां काय ? एकदम तरवार चालवा. [ सर्व लढूं लागतात ] भलेबहाद्दर ! अशाच समशेरी चालवा. या एकटयाचं तुम्हांपुढं काय चालणार ? [ इतक्यांत उडी सरसा बाजी येतो. ]

**बाजी**—एकटाच कां ?—हा आला पहा त्याचा भाईबंद दुसरा. [ सर्वांची लढाई सुरू होते. मुसलमान मरून पडतात व एक पळून जातो. बाजी त्याचा पाठलाग करतो. ]

**गजरा**—धनी, छावणींत हा दंगा ऐकूं आला तर नसेल ना ?

**हिरोजी**—नाहीं. छावणी फार दूर आहे. शिद्दीचे पहारेकरी आणि आम्ही तटाशीं गस्त करीत होतां. पण माझ्या कैवारानं मुसलमानांशी लढणारा हा दुसरा वीर कोण ?

**गजरा**—धनी, मराठ्याच्या कैवारानं मराठ्याशिवाय कोण लढणार ? ते पहा सगळ्यांचे मुडदे पाडून मराठ्यांचे रणझुंजार बाजीप्रभू इकडेच येत आहेत.

**हिरोजी**—कोण बाजी ?–बाजी प्रभु हा ? [ बाजी येतो ]

**बाजी**—होय, बाजी प्रभूच मी.

**हिरोजी**—कशाला आलास ? सूडाच्या संतापानं वेडावलेल्या या हिरोजी-कडून स्वतःचा मुडदा पाडून घ्यायला ?

**बाजी**—मराठेशाहीच्या शिरस्त्याबरहुकूम वागणाऱ्या बाजीचा शिरच्छेदानं तुला सूड घ्यायचा असेल तर माझी गर्दन ही पहा तुझ्यापुढं झुकली. आटप, घाल वार. पन्हाळ्याच्या पक्या बंदोबस्तींत असलेला हा जीव तुझ्या मुला-खतीसाठीं ज्यानं असा दुष्मनांच्या छावणींत उतरून धोक्यांत घातला, तो मरणाला भिऊन नव्हे. तुला माझा सूडच घ्यायचा आहे ना ? आटप, उडीव गर्दन.

**हिरोजी**—बाजी, मी सूड म्हणतांच ताड्कन माझ्यापुढं गर्दन झुकवल्यानं मी दिपून जाईन असा का अंदाज आहे तुझा ?

**बाजी**—मुळींच नाहीं. सुडाच्या संतापानं खरोखरीच गर्दन मारण्या-इतका तूं निष्ठूर आहेस अशीच माझी खात्री आहे आणि म्हणूनच मीं तुझ्यापुढं शिरच्छेदासाठीं गर्दन झुकवली आहे. मात्र हिरोजी, माझं हें मस्तक धडावेगळं करण्यापूर्वी तूं जगदंबेची आण घेऊन याच पावलीं

शिवरायाच्या सुटकेपायीं गडावर धांवून जाईन एवढं मला वचन दे आणि नंतर माझा कंठच्छेद कर. तूं जाणतोसच कीं, हा मराठ्यांचा रणझुंजार बाजी समरांगणांत तुझ्यासारख्या पांचपन्नासांना भारी आहे. पण प्रसंगानं शिवरायांच्या रक्षणापायीं पाण्यानं डोळे डवडवून येऊन खाटकापुढील गाईगत तुझ्यापुढं अश्राप मान देतो आहे.

**गजरा**—नका–नका–बाजीराव, असं शिर नमवूं नका. मंदिरावरच्या कलंडत्या कळसागत मान अशी लवंडूं देऊं नका. पायांचे चाकर आम्ही—धनी, जळो जळो तुमचा संताप आणि जळो तुमचा सूड. कुणाची मान आणि कुणाच्या समशेरीखालीं झुकते आहे ? एकाच भोंसल्याच्या भाकरीनं पोसलेले प्यादेफर्जी तुम्ही. राजांचा गळा वैऱ्यांच्या गळफासांत गवसला असतां, एकमेकांचे गळे कापूं लागलांत ? केवढा आकांत गुदरेल याची कांहीं चाड धरा आणि समशेर बाजूला करा.

**हिरोजी**—मग काय करूं ? गजरा, मी निरपराधी असतां अपराधी ठरलो. अपराधी ठरलों म्हणून संतापानं बाजीच्या सूडाला पेटलो. आणि आतां सूडही न घेतां—वैऱ्याघरच्या चाकरीनं कलंकित झालेल्या तोंडानं राजांच्या दर्शनाला कसा जाऊं ?

**गजरा**—धनी, संतापाच्या झंझावातांत बुद्धीचा धर सुटला म्हणजे माणसाचं नशीब असंच अधोगतीला जातं. नशीब बलवान् म्हणून राजांनाच आज तुमची गरज पडली आहे. आपल्यावरचा फितुरीचा कलंक धुतला जायची वेळ आली आहे.

**हिरोजी**—काय माझ्यावरचा कलंक नाहींसा होणार ?

**बाजी**—नाहींसा होणार नव्हे–झाला. तुझ्या इमानदारीचा भरंवसा गजराच्या वर्तनावरून आणखी सांगीवरून धादांत पटला. माझ्या कानामध्यें तुझ्याविषयी संशयाची फुंकर मारणारा समंध गडावर अझून वावरतो आहे. जातांक्षणींच गिरफदार करतों त्याला.

**हिरोजी**—अहाहा ! असं होईल तर—काय सांगूं बाजी, तुमचा सूड उगवायचं मला कांहींच कारण नाहीं. तुमच्याशीं मगरूरीनं वागल्याची मी जन्मजन्मांतरी खंत धरीन, राजांच्या संरक्षणापायीं पेटल्या खाईत जिवाचा

अंत पत्करीन. मात्र माझ्या तोंडाला फितुरीचा कलंक लावणारा माझा वैरी मला दिसूं दे—

**बाजी**—ठीक आहे, चला तर गडावर. इथं जास्त रेंगाळण्यांत धोका आहे. [ जातात ]

---

## प्रवेश २ रा

[ **स्थळ**—पन्हाळगड ]

**काळूजा**—इथवर तर माझी मसलत कशी बिनधोक जुळली आहे. विजापूरच्या आदिलशाहीत आपला सवतासुभा बांधायचा माझा घाट कसा सुरळीत पार पडतो आहे. लखमसावंत सरदेसायांनीं स्वतःच्या कामगिरीसाठीं मला विजापुरला धाडलं. पण मी विजापूरला पोचतांच न्यारीच मसलत रचून आपल्याच पोळीवर तूप ओढून घेतो आहे. आतां यांत लखमसावंतांचा माझ्यावर थोडा घुस्सा होईल; पण झाला तर झाला. माझ्या थोड्याच लेकीमुना त्यांच्या घरीं नांदायच्या आहेत ? माझ्या या वागणुकीनं उद्यां त्यांच्यावर कांहीं आळ आला तरी मला त्याची पर्वा नाहीं आणि आतां मी बादशहाच्या मर्जीत असतांना लखमसावंतांची पर्वा तरी कां करावी ? माझ्या हिकमतीबरहुकूम शिद्दीनं ही मोहीम चालवली आहे. शिवाजीला एकाएकीं अचूक पन्हाळ्यावर कोंडला असल्यामुळं शिद्दी जौहर आणि फाजल महंमद माझे जिगरदोस्त बनले आहेत. बादशहानं तर या स्वारींत फत्ते मिळतांच मला जहागीर देण्याच कबूल केलें आहे. आतां एकदां या पाजी शिवाजीच्या पुढल्या हालचालीची किंचित् खबर मिळाली कीं, पुतळेला बगलेंत मारून संधीसंधीनं शिद्दी जौहरची छावणी गांठायची. अता आशेला जीव गुंतवायचा नाहीं. [ पुतळा येते ] आलीस ? बरं झालं. मिळाली का वाड्यांतील कांहीं खबर ? आपल्याला आतां जलदीनं इथून निघण्याची तयारी केली पाहिजे.

**पुतळा**—अहो ! निघतां कसले ? इकडे एकाएकीं एक नवीनच घोटाळा उडाला आहे.

**काळूजी**—घोटाळा ? कसला घोटाळा ?

**पुतळा**—अहो ! माझा दादा हिरोजी परत आला.

**काळूजी**—हिरोजी परत आला ? इथं गडावर ? हा काय घोटाळा आहे ? तो होऊन परत आला कीं त्याला परत आणला ?

**पुतळा**—तें कांहीं उमगलं नाहीं. पण वाड्याकडे जातांना आतांच मीं त्याला पाहिला. बरोबर गजरा वहिनीही होती. आणि भारी नवलाची गोष्ट म्हणजे खुद्द बाजीप्रभू त्याच्याशीं कांहीं कुजबुजत होते.

**काळूजी**—तूं म्हणतेस तरी काय ? बाजीप्रभूंनीं त्याला हद्दपारीची सजा दिली होती आणि ते त्याच्याबरोबर ?—तो शिद्दयाला जाऊन मिळाला म्हणून त्याला गिरफदार तर करून आणला नाहीं ना ?

**पुतळा**—तसा पकडून आणला असता तर काढण्या नसत्या का लावल्या ? निदान बरोबर एकादा शिपाई तरी असता ना ?

**काळूजी**—मग हें कसं झालं ? पुतळा, आतां असं कर–गजराला गांठ, तिला गोड गोड थापा दे आणि हळूच सगळी बातमी काढून घे. हें बघ, हिरोजी गिरफदार न होतां आला, बाजीप्रभूचं त्याच्याविषयींचं मत बदललं तर मला–तुझ्या नवऱ्याला धोका आहे. प्राणाशीं प्रसंग आहे हें ध्यानांत ठेव आणि बारकाईनं तपास काढ.

**पुतळा**—अं ! त्यांत काय आहे. गजरा म्हणजे अगदीं अजागळ आहे. जरा गोड गोड बोलीनं घोळवलं तर खडान्‌खडा बातमी टिपून काढीन. तिला कुठं मुत्सद्देगिरी ठाऊक आहे ? त्याला माझ्यागत अक्कल असावी लागते. अशा वेंधळ्या बायकांना का राजकारणं कळणार आहेत ?

**काळूजी**—जा तर याच पावलीं, जराही दिरंगाई लावूं नकोस ! खराच घोटाळा असला तर मानेला गळफास लागेल–नीट ध्यानांत ठेव–[ पुतळा जाते ]–हिरोजी परत आला आणि बाजी त्याच्याबरोबर ? या गजरेनं तर कांहीं घात केला नाहींना ? हिरोजी शिद्दीच्या छावणींत मुसलमानांच्या चाकरीस राहिला हें वर्तमान ऐकून मीं पुरेपुर जिंकली अशा समाधानांत गर्क झालों होतों. पण फिरून आतां धास्तीची कांचणी आली. शिवाजीनं बाजीला "हिरोजी परत मिळण्यासारखा असल्यास मिळवा" असं नाराजीनं सांगितलं आणि गडावरून बाजी एकाएकीं नाहींसा झाला, तेव्हांच मला जरा शंका आली होती. पण हा बाजी शिद्दीच्या छावणींतून हिरोजीला परत आणीलसं वाटलं नव्हतं. आणि हा संतापी हिऱ्याही परत फिरेलसा

माझा अंदाज नव्हता. पण अखेर दोघेही दाखल झाले अं ? जर कां आतां माझ्या कारस्थानाचं बिंग यांच्या ध्यानीं आलं तर आमची कंबक्तीच भरली म्हणायची ! हा बाजीसारखा सन्नाटा शिपाई माझीं हाडन्-हाडं खिळखिळीं करून टाकील. छे: ! पुतळा केव्हां खबर आणतेसं झालं आहे ! [ जातो ]

---

## प्रवेश ३ रा

**शिवाजी**—आमच्या हुकमाशिवाय-आमचा जिव्हाळ्याचा बोल मस्तकीं धरल्याशिवाय गडावरून बाजीप्रभु असे गेले तरी कुठं ? सगळ्या गडभर शोध करूनही त्यांचा मागमूस लागूं नये, हें घडलं तरी कसं ? चारी बाजूनं वैऱ्यांनीं घेरावं आणि हातींची समशेर गळून पडावी–शत्रूवर डावावर डाव करण्याची गरज असावी आणि मुठींतील फाशांची फसगत व्हावी, असं हें घडलं तरी कसं ? हद्दपारीऐवजीं हिरोजीला कैदेची सजा तुम्हीं द्यायला पाहिजे होती, हें कांहींशा उद्वेगाच्या भरांत आम्हीं बोलून गेलो, हं तर त्या स्वामिनिष्ठाच्या अंत:करणाला झोंबलं नसेल ना ? बाजीच्या हातून अविचार होणार नाहीं हें निभ्रांत आहे. पण " मिळण्यासारखा असल्यास हिरोजीला परत मिळवा " या आमच्या शब्दांसाठीं वैऱ्याच्या गोटांतही शिरून हिरोजीचा शोध करण्याचं धाडस करायला ते चुकणार नाहींत, याची आम्हांला धास्ती वाटते. हिरोजी गेला ही गोष्ट वाईट झाली, असं आम्हीं बोलतांच त्या मर्द मराठ्याचं तोंड खर्कन् उतरलं. कुठून बोललों असं आम्हांला झालं. पण न बोलूनही गत्यंतर नव्हतं. लोकसंग्रहाची बुद्धी सोडून राज्याची उभारणी होत नसते. एका विटेच्या कोसळण्यानं जशी सारी इमारत ढांसळून पडते तशी गरजेला उपयोगी अशा एका माणसाच्या अभावीं पहाडी मसलतीचीही फसगत होत असते, हें बाजींच्या लक्षांत यायला पाहिजे होतं.

**अनाजी**—[ प्रवेश करून ] महाराज, बाजी प्रभू आले.

**शिवाजी**—आले ? कुठं आहेत ?

**बाजी**—हा पट्टा आलों हुजूर ! आज्ञेवांचून अविश्वास शत्रूच्या गोटांत गेलों. कसुरीची क्षमा व्हावी—पण महाराजांच्या पायांच्या पुण्याईनं केल्या अविचाराचं पाप धुवून गेलं. यशाचा वांटा हातीं आला. हिरोजी नाईक बाहेर आपल्या हुकमाची वाट पाहात हजर आहे.

**शिवाजी**—काय ! हिरोजी आला ? अति उत्तम झालं. अनाजी, जा आणि आधीं तहाचं निशाण उभारा. मोर्चे फिरवून घ्या. तुम्ही स्वतः जाऊन शिद्दी जौहरला आमचा निरोप कळवा कीं, " किल्ला स्वाधीन करून आम्हीं शरण येतों आणि कसम खाऊन अभय दिल्यास आम्ही जातीनं किल्ल्याखालीं येऊन स्वाधीन होतों. पण लढाई बंद करा. " जा ! एका क्षणाचाही विलंब करूं नका—निष्कारण मनुष्यसंहार होऊं देऊं नका.

**अनाजी**—जशी आज्ञा. [ जातो ]

**बाजी**—महाराज ! हें काय ? अफझुलखानाच्या भेटीचा दाखला ताजा असतांना आतां या शिद्दीजौहरच्या भेटीला जातीनं जाणार ?

**शिवाजी**—नाहीं बाजी-शिद्याच्या भेटीला आम्हीं जाणार नाहीं तर—

**बाजी**—हां समजलो.

**शिवाजी**—होय तसंच. आतां पुढील कामगिरी तुम्हांकडे. आमचा पोषाख चढवून हिरोजीला आमच्याकडे पाठवून द्या आणि एकदम कूच करण्याची तयारी ठेवा. हिरोजी शिद्दीच्या छावणीत जाऊन पोंचण्यापूर्वी आपल्याला अर्धी अधिक मजल गांठली पाहिजे. आम्हांला आतां संकट आहे तें एकच—त्या नेकजात पोरीचं समाधान करणं. आमच्या रूपानं हिरोजी शिद्दीच्या छावणींत गेला कीं, परत येत नाहीं हें निश्चित आहे. बाजी आधीं त्या प्रेमळ पोरीला समाधानाचे चार शब्द सांगून आल्या प्रसंगाला तोंड देण्याची तिच्या मनाची तयारी करवा. आई भवानीची कृपा असेल तर सर्व कांहीं सुरळीत होईल. [ जातो ]

**बाजी**—कोण आहे रे तिकडे ? [ शिपाई येतो ] पलीकडच्या दिवाणखान्यांत हिरोजी नाईकाची बायको गजरा आहे तिला इकडे पाठवून दे. [ शिपाई जातो ] आतां या पोरीला काय सांगूं ? महाराजांचा निरोप तिला कोणत्या शब्दानं बोलून दाखवूं ? मति कुंठित होते—जीभ कोरडी पडते—पांगळ्या वाचेनं तिचं समाधान कसं करावं तें कळेनासं होतं !

[ गजरा येते व नमस्कार करते ] सौभाग्यवती हो. मुली, आम्हीं तुला कां बोलावलं कळलं का ?

**गजरा**—आम्ही हुकमाच्या चाकरांनी धन्याचं मन पारखीत रहायचं नसतं. आज्ञा व्हावी.

**बाजी**—जिवावर उदार होऊन तूं आमच्याबरोबर आलीस. हिरोजीला परत आणलंस याचं सर्व श्रेय तुला आहे. पण गजरा, कुठल्या कृतांत-काळाच्या जबड्यांत लोटण्यासाठीं हिरोजीला आणला याची तुला दख्खल आहे ?

**गजरा**—नाही सरदार ! राजांघरच्या मोहिमेच्या मसलती आम्हां चाकरांना कशा कळणार ?

**बाजी**—ऐक मुली, वेळ मोठी बिकट आली आहे. चहूंकडून पन्हाळ्याला वेढा पडला आहे. दौलत आज संकटांत आहे. उघड्या मैदानावर दुष्मानांशीं तोंड देण्याइतकी फौजेची तयारी नाहीं. गड लढवून वैऱ्याला जेरीस आणावं म्हटलं तर दाणावैरणीची बेगमी झाली नाही. स्वतः महाराज वेढ्यांत अडकून पडलेले, तेव्हां स्वराज्याची दौलत धोक्यांत घालायची छाती नाहीं. गळ्याला तांत लागण्याची वेळ आली आहे. या वेळीं दौलतीची अब्रू सांभाळणं, मुली, तुझ्या हातीं आहे.

**गजरा**—काय करूं ? सरदार, सांगा, काय करूं ? महाराजांच्या राखणीसाठी स्वराज्याच्या दौलतीसाठीं–मराठेशाहीच्या इभ्रतीसाठी या देहाच्या पायघड्या करून जर दौलतीला पाऊलवाट मिळत असेल, तर तसं सांगा—एका पळाचाही विलंब न करतां सांगाल त्या संकटांत उडी घेईन. सांगा—

**बाजी**—त्याहूनही कठीण दिव्य तुला करायला सांगणार आहें. देहाची सांड करणं हें शिपायाचं ब्रीद आहे. मराठेशाहीच्या धामधुमीच्या काळांत हजारों शिपायांनीं दौलतीसाठीं आपल्या प्राणांचे बळी दिले आहेत. हजारों शिपाई आज तळहातावर मस्तक घेऊन जिवाची आहुति देण्यासाठीं संधीची वाट पहात आहेत. मर्दांच्या मर्दुमकीनं आजचं संकट टळण्यासारखं असतं तर तुझ्यापुढं आम्ही पदर कां पसरला असता ? मर्दांच्या मर्दुम-कीची गोष्ट पुढं आहे; पण मायभवानीचं नांव घेऊन मराठ्यांच्या मुली-

मराठेशाहीसाठीं केवढी मोठी कुरवंडी करतात हें दुष्मनांना दाखवून त्यांचे डोळे दिपवून टाकण्याची कामगिरी करायला तुला मी सांगणार आहें.

**गजरा**—तळहातावर शिर घेऊन समरांगणीं लढायला मराठ्यांच्या मुलीही भीत नाहींत, हें दुष्मनांना दाखवून द्यायला मला सांगणार आहां काय ?

**बाजी**—त्याचीही जरूरी नाहीं. मुली, प्राणापेक्षां प्यार, अब्रूपेक्षां थोर, देवाच्या आशीर्वादापेक्षांही ज्याचा मोठा बडिवार असं तुझं सौभाग्य दौलतीच्या चाकरीसाठीं मृत्युमुखीं लोटण्याकरितां आज आम्हीं तुझ्याकडे मागत आहों.

**गजरा**—मृत्युमुखीं लोटण्यासाठीं माझं सौभाग्य ? सरदार, माझ्या धन्यांना ज्या दिवशीं आपण कडेलोटाची शिक्षा सांगितलीत, त्याच दिवशी माझं सौभाग्य गेलं होतं. माझ्या अर्जीला भीक घातलीत-पतीचे प्राण परत दिलेत-सावित्री-सारखी मला भरल्या मळवटानं घरीं धाडलीत, त्याच घटकेला मी आपल्या ओटींतली लेक झालें आहें. ऋणाच्या मोलानं सौभाग्य मिळालं; पण धन्याच्या मनाला तें मानलं नाहीं. घरचा लोभ तोडला—घरवालीचा हात सोडला—दौलतीची साथ सोडून धन्यांनीं वैऱ्यांशीं हात जोडला; पण या पायांच्या कृपेनं फिरून आज धनी थाऱ्यावर आले. ते जर दौलतीच्या रक्षणाला कारण होत असतील, तर काय सांगू सरदार–डोळां आंसवं येतात, बोलीं जीभ ढळते, पण घरीं आल्या धन्याला दौलतीच्या मोलीं पुन: आपल्या पदरांत घालतें. यापेक्षां मी काय करूं ? सांगा सरदार, आणखी काय करूं ?

**बाजी**—मुली कसाबासारखा कठोर होऊन तुझ्यापुढं पदर पसरतों आहें, तो महाराजांच्या कुरवंडीसाठीं. एका जिवाची कुरवंडी उतरावी तेव्हांच महाराजांना या संकटांतून पायवाट होणार आहे. तूं महाराजांना पाहिलं आहेस. हिरोजीचा चेहरा महाराजांसारखा आहे--थोड्याशा सजावटीनं हिरोजी थेट महाराजांसारखा दिसेल. तहाची बात सुरू झाली आहे. महाराजांना गडाखालीं जातीनं गेलं पाहिजे. अफझुलखानाचे वेळची तुला माहिती आहे. शिद्दी जौहर निमकहराम आहे. विश्वासाचा शब्द देऊन तो बिनदिक्कत महाराजांवर उलटेल आणि महाराजांच्या जिवाला जर का

अपाय झाला तर, नको-नको तो विचार. महाराजांच्या रूपानं हिरोजीलाच दुष्मनांच्या छावणींत गेलं पाहिजे आणि प्रसंगीं राजांच्या बदल्यांत त्यानं प्राण सोडला पाहिजे.

**गजरा**—सरदार ! शिपाई गड्याच्या बायकोच्या निढळींचा कुंकवाचा टिळा नेहमींच तरवारीच्या धारेशीं धोक्यांत असतो. शिपाया शेजारीं बाशिंग बांधलं तेव्हांच कपाळींचं कुंकू डळमळींत झालं. लढाईवर जायला निघालेल्या घरच्या घरधन्यांना निरोप देतांना डोळ्यांत आसवं येतात; आसवांच्या धारांना पदरानं निरपतांना नकळत कुंकूं अर्धआधिक वाढवावं आणि वाटेकडे डोळे लावून, आसवं पुसतांना एक दिवशीं कुंकूं पुरतेपणीं वाढलं जावं, हें शिपायाच्या बायकोचं भाग्यच आहे. मग इथं तर माझं कुंकूं आपल्या घरच्या करंड्यातलं-हातींचा चुडा आपल्या घरीं गहाण पडलेला. सरदार ! माझं सौभाग्य माझ्याकडे कसलं मागतां ? तुम्हीं दिलं-तुम्हीं घेतलं-दौलतीच्या कामीं आलं तर कुंकवाचं सार्थक झालं. दर्यावरच्या लांब प्रवासाला निघालेल्या कोकणच्या नावाड्यांच्या घरधनिणी हातींचा चुडा वाढवून आपल्या पतीची आलाबाला उतरतात, तसा वैऱ्यांच्या दर्यात महाराजांच्या संरक्षणासाठीं जीव धोक्यांत घालायला निघालेल्या घरधन्याच्या जीवावरची आलाबाला उतरण्यापायीं, हा पहा, मीं हातींचा चुडा-[ चुडा आपटते ]

**बाजी**—अहाहा ! धन्य ! धन्य !! मुली, या अलौकिक स्वार्थत्यागानं तूं रणधुरंधरांनाही लाजविलंस ! वडीलकीच्या मायरक्ताची ओंजळ वाहून पुढल्या पिढीची आई झालीस—महाराष्ट्राच्या उघड्या राउळीची रखुमाई राई झालीस. वीराच्या वीर पत्नी, हा बाजी प्रभू तुला साष्टांग दंडवत करतो.

**गजरा**—हं, हं, मराठ्यांच्या रणझुंजारा, हें काय करतां ? धडापासून तुटलेल्या दुष्मनांच्या मुंड्यांनीं ज्यांच्या पायीं लोटांगणं घ्यावीं, त्यांनीं एका नांव नसलेल्या पोरीपुढं ही मोलाची मान वांकवून कसं होईल ? वडिलांनीं दंडवत केला तर लेंकराचं आयुष्य खुटतं म्हणतात, सरदारसाहेब.

**बाजी**—आयुष्याची तुला काय कदर ? कृतांत काळाला चारित्र्यानं दाबून यमाला जरब लावणाऱ्या सावित्रीची तूं आजची मूर्ती-मराठ्याच्या मुली,

तूं अखंड आहेस. [ हिरोजी येतो ] पुन्हां संकट. ये ! ये ! हिरोजी. हे कसाब-करणीसारखे हुकूम सोडतांना काळजाचं कसं पाणी होतं. हिरोजी, तूं खंदा वीर आहेस तसाच बेगुमान हेरही आहेस. आजची सजावट तुझ्या ध्यानीं आली असेल. [ शिपाई थाळींत शिवाजीचा पोषाख घेऊन येतो ] हें तें मोलाचं लेणं. महाराजांची आज्ञा आहे कीं, ' हा आमचा पोषाख चढवून हिरोजीला आमच्याकडे पाठवून द्यावा. ' पुढील कामगिरी महाराजच सांगतील.

**हिरोजी**—काय सांगतां बाजी प्रभू ! हा पोषाख मी अंगावर चढवूं ? ज्या अंगरख्याच्या घोळाचं नुसतं वारं लागावं म्हणून शहाण्णव कुळींचे मराठे उराला हात लावून एकापुढं एक होतात, तो हा पोषाख या नादान देहावर चढवूं ? उघड्या पडलेल्या महाराष्ट्रावर पांघरूण घालण्यासाठीं सज्ज राहि-लेला हा दुपट्टा ज्या मर्दानीं कमरेला मिठी मारून बसलेला असतो, तो हा दुपट्टा सुडाच्या राक्षसी विचारानं वैऱ्याघरीं धांवणाऱ्या या निमकहराम कंबरड्याला लपेटूं ? हें पट्टा पडदळ, ही महाराष्ट्राची मायभवानी–कोंकणच्या सावंताघरून देशाचं तोंड उजळ करण्यासाठीं आलेली ही भवानी तरवार–आणि ही पैजार–बाजी प्रभूजी, काय हा प्रसंग ? या आमच्या देहाचं कातडं सोलून ज्यांच्या पायांची पैजार करावी—त्या राजांच्या पायांनीं पावन झालेली ही पैजार—बाजी प्रभूजी, हिला पाय कसा लावूं ? अशी उराशी कवटाळावी, डोळ्यांनीं न्याहाळून भाळीं धरावी-पादुका म्हणून पूजा करावी–ती ही मराठ्यांच्या मायबापाची पैजार माणसापायींच्या चढावागत पायीं कशी तुडवूं ? नाहीं, सरदार ! नाहीं. सर्वांपरीस ऊर फुटतो तो इथं ! आणि हा जिरेटोप—

**बाजी**—हेरकुळाच्या भाग्यवंता ! आतां पुढं बोलूं नकोस. काळाचा घाला जवळ आला आहे, प्राण कंठाशीं आला आहे. या वेळीं एकएक पळ युगासारखं झालं आहे. जा, बहिर्जी नाइकाच्या सच्चा शागिर्दा, हिरोजी म्हणून जा आणि असा महाराज बनून ये कीं, अष्टौप्रहर राजांची मूर्ती नजरेंत घोळवणाऱ्या या बाजीचं मस्तक देखील पहातांक्षणींच मुजऱ्यासाठीं आपोआप तुझ्यापुढं झुकेल. [ शिपाई व हिरोजी जातात ] नेताजीचं भाग्य आज हिरोजीनं चोरलं. आजच्या प्रसंगापायीं हिरोजी जाईल; पण

पुढल्या प्रसंगासाठीं नेताजी उभा राहील. अशीं उघड्या डोळ्यांनीं मृत्यूला कवटाळणारीं माणसं मिळायला खरोखर भाग्य असावं लागतं ! आणि अशा उजळ तोंडाला बेइमानीचा कलंक लावणारीं माणसं—हा पहा हिरोजीच्या तोंडाला काळोखी लावणारा मांग काळूजी चतुर्भूज होऊन आला. वैऱ्याच्या दरबारीं मराठेशाहीची ज्यानं मान कापली, रक्ताचं नातं विसरून मेव्हण्याशीं ज्यानं हरामखोरी केली, खोटया तोहमतीचा पैगाम रचून या बाजीच्या बुद्धीला देखील ज्यानं भुरळ घातली [ शिपाई काळूजीला घेऊन येतात ] तो हा बेरड काळूजी जाधव.

**काळूजी**—सरदारसाहेब, हा काय अनर्थ ? अचानक मला असा गिरफदार करून आणलंत यांत मी समजावं तरी काय ?

**बाजी**—काय समजायचं तें आपल्या मनाला विचार ! हृदयींच्या देवाला विचार. मराठ्यांच्या राजवटीला फितुरीचा सुरुंग लावण्यासाठीं रक्ताचं नातं विसरून प्रत्यक्ष मेव्हण्याच्या गळ्याला अन्यायी दोषारोपाचा फांस लावणाऱ्या मांगाला यापेक्षां काय उत्तर द्यायचं !

**काळूजी**—सरदारसाहेब, नसता आरोप करून उत्तराला सुद्धां वाव ठेवला नाहीं ह्मणजे न्यायाची कदर ठेवली असं होत नाही.

**बाजी**—काय, हिरोजीवर तूं बालट घेतल्याचं कबूल नाहीं तुला ?

**काळूजी**—हिरोजीवर मी बालंट कसा घेईन ? तो माझा मेहुणा आहे.

**गजरा**—पण ही पहा मी त्यांची बायको इथं आहें. आधीं नीट माझ्याकडे पहा. बाजीप्रभूंच्या या मुखाकडे पहा आणि असं धादांत खोटं बोलायचं धाडस करूं नका.

**काळूजी**—अस्सं, हें तुझं कारस्थान एकूण ! मला वाटलंच होतं—मघांशीं तुह्मीं तिघंही आल्याचं समजलं, तेव्हांच माझ्यावर कांहीं तरी बालंट येणारसं वाटत होतं मला.

**गजरा**—कां ? असं कां वाटलं तुह्मांला ? झाडाची पालवी हालली ह्मणून आकाशींची कुऱ्हाड आपल्या माथीं पडेल अशी गुन्हेगारागत शंका तुमच्या मनांत कां आली ?

**काळूजी**—अशी कां शंका आली हें इथं सांगण्याची माझी इच्छा नाहीं. माझा न्याय माझे धनी सरदेसाई करतील. लुटारूंच्या दरबारांत मला न्याय मागायचा नाहीं.

**बाजी**—बेवकूब ! कोण लुटारू ? सरदेसायांशीं फारकत करून शिवाजी-महाराजांच्या सेवेला वाहून घेण्यासाठीं आलों, असं ज्या जिभेनं ह्मणालास त्याच जिभेनं असे बेताल शब्द उच्चारशील तर दोन वेळेला दोन तऱ्हेनं बडबडणारी तुझी जीभ नीट पारखून पाहण्यासाठीं उखडून काढली जाईल, हें ध्यानांत ठेव. तुझ्यासारख्या कुसंतानाकडून मराठेशाहीचं निसंतान होईल हा भ्रम सोडून दे. मराठेशाहीचा पाया काय वाळूच्या कणावर उभारलेला आहे कीं, अदिलशहाच्या एका फुंकरीनं तो डळमळूं लागेल ?

**गजरा**—प्रत्यक्ष बायकोच्या भावाच्या प्राणांपेक्षां—मराठेशाहीच्या रक्षणापेक्षां, अदिलशाहीची सेवा तुह्मांला मोठी वाटली अं ?

**काळूजी**—मला काय वाटलं आणि काय नाहीं याचा मी तुमच्यासारख्या लफंगटांसमोर जाब देत नाहीं. जा तुह्मांला काय वाटेल तें करा.

**बाजी**—ठीक आहे. कोण आहेरे ? [ शिपाई येतात ] या निर्लज्जाला असा नेऊन अंधार कोठडींत अन्नपाण्यावांचून डांबून टाका. तडफडून तडफडून किंकाळ्या फोडून याला तिथं प्राण सोडूं द्या. [ शिपाई त्याला नेतात ] गजरा, आतां तुझा पती निर्मळ झाला. त्याला वृथा कलंक लावणारा काळसर्प कृतकर्मांचे झाडे देण्याकरितां अंधारकोठडींत गेला. आणि हा पहा, मृत्यूच्या मोलानं राजाचं राजेपण पत्करून—हा पहा हिरोजी सहीसही सजावट करून आला. ये, ये, हिरोजी, जवळ ये. स्वातंत्र्यासाठीं राजांच्या जिवावरचा उतारा ह्मणून बळी जायला निघालेल्या भाग्यवंता, अगदीं माझ्याजवळ ये. माय माऊली जगदंबा तुझं नांव अजरामर करील.

**हिरोजी**—काय सांगूं सरदारसाहेब ! पोषाख अंगावर चढवला, रंगानं चेहरा मढवला; पण अंतरींचा थरकांप कांहीं थांबत नाहीं. जिवाचा पापी, मनाचा कोपी आणि वैऱ्याघरचं अन्न खाऊन शापीं पडलेल्या या देहावर त्या पुण्यश्लोकाचा हा पेहराव चढवतांना हात लुळा पडला. पैजारेशीं पायाचा थरकांप झाला. हा देवाचा मुकुट माझ्या मूर्खाच्या मस्तकीं धरवेना. हृदय थरारतं, अंग शहारतं, काय होतं तें सांगायला जीभ लुली पडते. आजवर हजारों सोंगं घेतलीं, संतमहंत झालों तसा भिकारी फकीर बनलों. रावाच्या रूपानं राजदरबारीं भिडलों, तसाच रंकाच्या रूपानं दारोदार हिंडलों; पण

हा राजांचा वेष घेतांना मात्र आंगावरच्या रोमरोमांतून कसल्या वृत्तीचा थयथयाट चालला आहे तें सांगायला शब्द नाहींत. हा जिरेटोप—

**बाजी**—गजरा तुझ्या माथीं चढवील. मराठकुळींच्या रणधीरा, प्रसंगाचं मोल ओळखून मनाचा तोल सोडूं नकोस. गजरा, माझे मुली तुला काय सांगूं ? मुलीचं मन ओळखलं नाहीं तर बापाच्या जातीला बट्टा येईल म्हणून सांगतों, हा जिरेटोप याच्या माथ्यावर चढीव. निर्वाणकाळची भेट घे, तोंपर्यंत मी वकिलातीच्या शिबंदीची तयारी करतों. हिरोजी, पुढचा प्रसंग आठवला तर हृदय दाटतं, गहिंवरानं शब्द बोबडा पडतो, स्नेहाचं दहिवर डोळ्यांवाटे खालीं येऊन मन बावरूं लागतं. ये–रणमर्दा, एकदां मला असा भेट कीं, त्या भेटीची मिठी हातीं पायीं सुटली, तरी आठवणीची खूणगांठ अनंतकाळ बांधली जावी. [ भेटतात. बाजी जातो. हिरोजी व गजरा क्षणभर स्तब्ध पहात राहतात. ]

**हिरोजी**—गजरा—

**गजरा**—धनी—

**हिरोजी**—गजरा, वडिलांची चाहूल कानाच्या पल्ल्यापलीकडे गेली–आतां दूर कां ?

**गजरा**—दूर कां ? धनी ! कुठं आहेत माझे धनी ? जे समोर दिसतांच डोळ्यांतली चांदणी चटदिशीं चमकते, कुडींतली जिव्हाळी हृदयांत थडकते, देहांतले पंचप्राण डोळ्यांत सांठवतात आणि कटीवरचे हात मिठीसाठीं पुढं होतात– ते माझे धनी कुठं आहेत ?

**हिरोजी**—हा मी तुझ्यासमोर उभा आहें ना ?

**गजरा**—कोण समोर उभं आहे ? कुंकवाचा मालक कीं राउळींचा देव ?

**हिरोजी**—मी नाइकांचा हिरोजी तुझ्यासमोर उभा आहें.

**गजरा**—हा मनाचा लपंडाव कीं डोळ्यांची भुरळ ? झाल्या गोष्टींची आठवण झाली, पुढल्या ताटातुटीची काळघटका समोर दिसली कीं, वाटतं, धावून कडकडून मिठी मारावी; दुबळ्या जिवाला वीराच्या छातीचा आसरा द्यावा. मानेवर मान टाकावी आणि डोळे मिटून ढसढसां रडत जीवींचं दुःख हलकं करावं. डोळे वर केले, हात पुढं उभारले आणि पांखरागत भरारी मारण्यासाठीं टांच उंचावली, तर समोर शेजेच्या सख्या-

जागीं मराठ्यांचा मायबाप दिसतो. मन बावरतं, चित्त घाबरतं, गुडघे लटके पडून देहाचा तोल कोसळतो आणि पायांवर अशी लोळण घ्यावीशी वाटते. [ पायांवर कोसळून पडते ]

**हिरोजी**—[ तिला वर उचलून हृदयाशीं धरून ] जिवींच्या जिवलगे, माझ्या राजसे, दोन डोळ्यांनीं तुझं मुख न्याहाळतांना डोळ्यांची तहानभूक हजारपटीनं वाढूं लागते आणि जिवाच्या मोलानं देवापायीं हजार डोळ्यांचं दान मागणं मुखीं येतं. गजरा, जिवलगे, हीच आतां आपली शेवटची भेट ! पापाच्या कर्दमांतून या हिरोजीला वर काढण्यासाठीं पुण्याईचं निरांजन पाजळलंस, त्यामुळं स्वर्गाचं द्वार जवळ दिसूं लागलं. पापाची कात टाकली, देवाची शाल पांघरली. आतां पंख फुटले कीं, स्वर्गीं उडून जाईन आणि वैकुंठींच्या दरवाजावर माझ्या सख्या सोबतिणीची वाट पहात राहीन—

**गजरा**—धनी, जीवाच्या मोलानं दौलतीची राखण विकत घ्याल, पण ही पायाची बटीक मागं झुरत राहील तिची काय वाट ? सर्ज्याच्या जिवासाठीं या देहाचं सोनं होईल; पण मंगळसूत्राच्या पासंगतोलानं सांवरलेलं या सोबतिणीचं जिणं सुनं होईल त्याची काय वाट ? सौभाग्याचं वाण दिलं, पंचप्राणाचं त्राण दिलं; पण या भरल्या मराठेशाहीत दासीच्या व्रताचं उद्यापन राहून जाईल, त्याची कोण्या मोलानं फेड होणार ? कुणा सभाग्याच्या करवीं या आहेव देहावर सतीचं लेणं चढणार ? धनी, वैऱ्याची समशेर आतां आपल्या उरांत रिघेल, त्या वेळीं तरी या दासीचा प्राण कुडी सांडून बाहेर निघेल, असा देवाच्या वाणीनं आशीर्वाद द्या.

**हिरोजी**—गजरा–गजरा–घेतल्या वेषानं आधींच हृदय करपून गेलं आहे, त्याला दुःखाच्या धक्क्यांनीं असं हादरून टाकूं नकोस. बाजीरायाचा हुकूम मान आणि मोर्लीच्या पळाची आठवण ध्यानीं आण. गजरा, हा पाहिलास जिरेटोप. याला मुजरा कर. ज्याच्या झळाळीनं हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंतच्या वैऱ्यांची आसनं करपून निघतात, तोच हा महाराष्ट्राचा राजमुकुट. . गुलामगिरीच्या काळोखांतून मराठ्यांच्या डोळ्यांना हिंदवी स्वराज्याची सत्ता दाखवणारा हा माध्यान्हींचा सूर्य हातीं घे. विजयानगरच्या यादवांनीं घालवला, देवगिरीच्या जाधवांनीं हरवला, शहाजीराजांना दिसला पण गवसला नाहीं, तोच हा महाराष्ट्राचा पंचप्राण आज

चाकरीच्या भाग्यानं या दुर्भाग्याच्या दरिद्री माथ्याकडे पहात राहिला आहे, त्याला हात दे. या मस्तकावर ठेव. धन्याच्या मोलानं चाकर सजला, या पुण्याईचं पाप फेडण्यापायीं कुडीची कुरवंडी करण्यासाठी मायभवानीच्या बोलानं तुझ्या तोंडचा आशीर्वाद दे. घटका भरत आली. ताटातुटीचा दुखवटा आतां इथंच संपला.

**गजरा**—[ जिरेटोप घेऊन ] देहाची सांड तर देवाची भेट, ही संतांची वाणी सफल झाली. मराठ्यांच्या शहाण्णव कुळांचा उद्धार झाला. नाइकांच्या घराण्यांतला एक अंकुर सर्जेराजांचा पाईक झाला म्हणून आज बेचाळीस पूर्वजांना स्वर्गाचा दरवाजा आतां खुला होईल. धनी, ही शेवटची हांक. धनी, मान पुढं करा. देवाच्या भुकेसाठीं चांगुणा राणीनं ओटींतलं मूल चरचरां चिरलं; पण डोळ्यांत आसूं आणलं नाहीं. मयूरध्वजाच्या राणीनं अतिथीच्या भिकेसाठीं पतीचा माथा करवतीनं कापला; पण डोळ्याला पदर लावला नाहीं. त्याच कुळींची मी एक लेंक—आलं टीप गिळून हा मराठ्यांच्या देवाचा किरीट या जिवाच्या देवाच्या माथ्यावर ठेवतें. [ जिरेटोप घालते ]

**हिरोजी**—छत्रपतींच्या पादुकांनों, दासाला क्षमा करा, [ चढाव मस्तकावर ठेवतो ] माथ्याच्या स्पर्शानं सातां जन्मींचीं पापं उद्धरून जावीं, ती ही आमच्या दैवाची पैजार या अभागी भाग्यवंताच्या पायाला बिलगणार आहे याची, माय-भवानी मला क्षमा कर. [ तीन वेळ मुजरा करून पायीं घालतो. ] गजरा मन आतां कठोर कर—वर देवाकडे पहा आणि छत्रपतींच्या या उत्सवमूर्तीला दुरून प्रणाम कर. [ गजरा मुजरा करते. बाजी, अनाजी व शिपाई प्रवेश करतात व मुजरा करतात. ]

**हिरोजी**—अनाजी, स्वारीची तयारी झाली ?

**अनाजी**—जी महाराज.

**हिरोजी**—चला तर पुढं व्हा.

[ सर्व मुजरा करतात. पडदा पडतो ]

## अंक ३ रा समाप्त

# अंक ४ था

## प्रवेश १ ला

( **स्थळ**—छावणींतील पटांगण )

**हांसम**—या अल्ला—या खुदा—परवरदिगार, तुझी करामत अजब आहे. लढाई न करतां जशी ही जखम मिळाली तशीच तुझ्या करामतीनं लूटही मिळेल तर बहार होईल ! दख्खनची औरत घेतल्याशिवाय मी विजापुरीं तोंड तरी कसं दाखवूं ? त्या दिवशीं त्या बदमाष मराठ्यानं आफत आणली. ओंठावरचं जांभूळ कावळ्यानं पळवून न्यावं तसं झालं. हातीं आलेली औरत अचानक हातावेगळी झाली. काय करूं रे ! मी बेशुद्ध पडलों, नाहीं तर त्या नापाक मराठ्याच्या ठिकऱ्यान् ठिकऱ्या उडवल्या असत्या. पण इष्काच्या वारापेक्षां समशेरीच्या वारानंच दगा दिला. ती परी तर आमच्यावर बेहोष प्यार होती. कां न होईल ? मी फाजल महंमदचा साला ! माझ्या गुलजार चेहरेपट्टीची कट्यार तिच्या उरांत बसली असेल आणि आतां इष्काच्या माऱ्यानं बिचारी माझं नांव घेत आंसूं टाकीत बसली असेल ! ओ मेरी प्यारी ! तुझपर जान कुर्बान है. [ पडद्यांत दवंडीवाला "अलीशान खानेअज्जम खुदावंत सलाबतजंग शिद्दीजौहर यांच्या तमाम फौजांना जाहीर करण्यांत येत आहे कीं, बादशहाच्या दराऱ्याला भिऊन, डोंगरचा उंदीर मराठा शिवाजी आह्मांला शरण आला आहे. तहाचं निशाण उभारून त्यानं पन्हाळ्यावरचे आपले मोर्चे उतरले आहेत. तरी सर्वांनीं खुदातालाची खैर मानून सारा दिवस रंगदंगलींत घालवावा, असा फौजमुक्त्यारसाहेबांचा हुकूम आहे हो–" ] हं ! हं ! हं ! हं ! या अल्ला ! खुदाताला शिवाजीला सलामत राखो. मर्द असावा तर असा असावा कीं, त्यानं शरण जायला भिऊं नये. उगीच लढाई करून मुडदे पाडण्यांत काय हांशील ? वारे मेरा शिवाजी ! अरे वारे मेरा तकदीर ! आतां माझ्या परीला या करवीरच्या परस्तानांतून मी शहून शोधून काढीन.

[ कासम येतो ]

**कासम**—वा दोस्त ! अगदीं वेळेवर भेटलास, आतां मात्र तुझ्या मनासारखं झालं. [ पुन्हां दूर दवंडी ऐकूं येते ] दवंडी ऐकलीस ? आतां तुझी चैन झाली. चोरीचं कारण नाहीं, अधिकाऱ्यांची जरब उरली नाहीं. उघड्या माथ्यानं नाचरंग करायला कुणाच्या बापाचीही भीति नाहीं.

**हासम**—अबे, नाचरंग कसला घेऊन बसला आहेस ? आतां तहाच्या वाटाघाटीसाठीं शिवाजी खानाच्या शामियान्यांत येणार आहे. तिथं मला हजर राहिलं पाहिजे.

**कासम**—तहाच्या वाटाघाटीसाठीं तूं जाणार आहेस का ? सलाबतजंगांच्या माथ्यांतली अक्कल इतक्यांतच खपून गेली वाटतं ?

**हासम**—सलाबतजंगांच्या माथ्यांत उमाप अक्कल असेल; पण मी फाजलसाहेबांचा साला ना ? या साल्याच्या सल्याशिवाय काय मगदूर आहे त्याची तह करण्याची ?

**कासम**—अस्सं ! एकूण तहाच्या अटी तूं ठरवणार आहेस तर ?

**हासम**—बेषक ! पहिली अट मी अशी घालणार कीं, माझ्यावर आषक होऊन आलेली ती दख्खनी औरत–गजरा माझ्या स्वाधीन करावी. दुसरी अट, तिला पळवून नेणारा निमकहराम मरगट्टा तो हिरोजी नाईक याला गजरेच्या हातून सुळावर चढवावा आणि तिसरी अट, शहरांत लूट करतांना औरता उचलायचा परवाना फक्त या हासमभाईलाच असावा. इतर शिपाईप्याद्यांनीं किरकोळ मालाची लूट करावी आणि मुद्देमाल तेवढा माझ्या सुपुर्द करावा. याउप्पर त्यांनीं वाटेल त्या अटी घालाव्या–माझी मुळींच हरकत नाहीं. [ नौबत वाजते ] ऐक, ही नौबत झाली. शिवाजी पन्हाळ्यावरून निघाला.

**कासम**—चल तर लौकर. शिवाजी कसा आहे हें पहायची मलाही घाई झाली आहे. [ जातात ]

---

## प्रवेश २ रा

[ खानाचा शामियाना. शिद्दी जौहर व फाजल महंमद बसले आहेत. नौबत वाजत आहे. ]

**जौहर**—फाजलसाहेब, शिवाजी पन्हाळ्याहून निघाल्याची नौबत वाजते

आहे. ही नौबत नव्हे तर माझ्या फत्तेहमंदीचा विजापुरा पोंचणारा हा डंका आहे. सुलतानाच्या तक्तासमोर पैजेचा विडा उचलून निघालों, त्याचं आज चीज झालं. अवरंगजेबासारख्या मानी मुत्सद्याला ज्यानं दिल्लीला परत फिरवलं, जंजिऱ्याच्या बेगुमान हबशाची ज्यानं दोन्ही बाजूनं गळचेपी केली, विजापुरच्या तक्ताला भारी वाटणाऱ्या चंद्रराव मोऱ्याला ज्यानं जिवं मारलं, रुस्तुमजमानाचा फडशा उडवून आपल्या वालिदांसारख्या खंद्या समशेरजंगाचा ज्यानं नरगडी तोडून खून पाडला, तो हा अक्कलमंद शिवाजी, आज अचुक माझ्या पंजांत सांपडणार. असं वाटतं कीं, तो समोर येतांच या ताकदवान कवेंत दाबून त्याची मुंडी मुरगळूं, कीं तहानेलेला शेर जसा झडपेसरशीं बैलाचं नरडं फोडतो त्याप्रमाणं या दातांनीं त्याच्या नरडीचा घोट घेऊं !

**फाजल**—नाहीं–जौहरसाहेब तो माझा अधिकार आहे. माझ्या वालिदांची–अफझूलखानांची रूह रोजबरोज नजरेसमोर उभी राहून डोळे फाडफाडून मला सांगत असते कीं, " बेटा फाजल ! माझ्या खुनाचा पुरेपूर बदला घे. " रक्तानं माखलेला त्यांचा तो सिंहासारखा जबडा परांच्या गादीत ठेवलेल्या माझ्या माथ्यासमोर नाचूं लागतो. भाल्याच्या फाळाला अडकवलेलं तें त्याचं मुंडकं दांत करकरून माझ्या कानाशीं किंकाळतं " बेटा फाजल ! तुझ्या- आणि तुझ्याच दातांनीं त्या शिव्याच्या नरडीचा घोट घेऊन माझ्या खुनाचा पक्का सूड घे. " काय सांगावं जौहरसाहेब, तुम्ही नव्हतां–दिलजमाईचं ढोंग करून, माझ्या वालिदांना मिठी मारतांना त्या बेगुमान मरगठ्ठ्यानं पंजांत लपविलेलीं वाघनखं त्यांच्या पोटांत खुपसलीं आणि माझ्या वालिदांचा तो पाक कोथळा या नापाक जमिनीवर पाडला ! त्या वेळचा तो रक्तबंबाळ देखावा अझूनही आमच्या कलेजांतल्या डोळ्यांसमोर दिसतो आहे. त्या रक्ताचा बुंदनबुंद आमच्या चिलखताचे जेरबंद तोडून अझून आमच्या कलेजांतल्या रक्तांत आगीचा डोंब उडवीत आहे.

**जौहर**—वा ! वा ! ! इन्सानची कर्तबगारी और आहे.

**फाजल**—म्हणून म्हणतों, जौहरसाहेब, आमचा दुष्मन शिवाजी आमच्याबरोबर येत आहे, तर माझ्या वालिदांचा सूड मला घेऊं द्या. असं

वाटतं कीं, पंजांच्या नखांनीं त्याच्या शरीराचे लचके लचके तोडून कबाबासारखे भाजून काढावे. असं वाटतं कीं, आमच्या वालिदांच्या कोथळ्यांत ज्या हातांनीं त्यानं वाघनखं खुपसलीं तो त्याचा हात मुळासकट उखडून टाकून त्याच्या शरीराचा राईराईसारखा खिमा करून बारा वाटांच्या बारा खवीसांना कुरबान करावा. आठवण होतांच अंगाची लाही होते, कलेजाचीं नौबत झडून सांगूं लागते कीं, " बेटा, या खुनाचा सूड घे. "

**जौहर**—सबूर करा, फाजलसाहेब, सबूर करा ! दिलाची कदरदानी दवडायचा हा बखत नव्हे. माझ्या नसांतलं रक्त तुमच्यासारखंच चिडून जात नाही असं कां तुम्हांला वाटतं ? पण हा बख्त नाही. या बख्तीं माथा थंड ठेवला पाहिजे. दिल काबूंत आणलं पाहिजे. गफलतीच्या दग्याला गफलतीचा डाव टाकून दुष्मनाला जिंदा गिरफदार केला पाहिजे. एका फटक्याचं काम आहे. तो नापाक मरगट्टा जमीनदोस्त होईल. पण त्या वेळींच सुलतानाची चाकरीही जमीनदोस्त होईल. कांटयाच्या पिंजऱ्यांत घालून आदिलशाहीच्या दुस्मानाला विजापूरच्या रस्त्यांतून दवंडी पुकारीत फिरवला की, तुमच्या वालिदांची बहिश्तींची रूह बिलकूल परेशान होऊन जाईल.

**फाजल**—बात सच आहे. पण कलेजांत वसलेला तो खुनाचा बाण दिलाला बेचैन करतो त्याला काय करूं ? जिवाच्या मोलानं वालिदांचा सूड उगवीन म्हणून खाल्लेली कसम अन्नाचा घांस गोड लागूं देत नाही. दुष्मन असा हातासमोर दस्तकदम आलेला कळला, कीं माथींचा मगज फाटून सुडाच्या भयानक विचारांनीं कुठल्या नेकजात मुसलमानाचा जीव बेफाम होऊन जाणार नाही ?

**जौहर**—बात सच आहे. पण गफलतीच्या मामल्याला बेफाम मर्दांनही कधीं कधी मान वांकवली पाहिजे. आज तहाच्या पहिल्याच मुलाखतींत आपण एकदम त्याच्यावर तुटून पडलों, तर सारा घाट बिघडला जाईल. मराठ्यांना जसा इथं आम्हीं वेढा दिला आहे, तशाच वेढ्याबाहेरच्या वाटाही त्यांनीं चारी तरफांनीं रोंखल्या आहेत. आपल्याला विजापुरीं परत जाणं आहे, तें फतेहमंदीच्या शिरताजानं झालं तरच दरबारच्या कसमेचं मोल आहे. चौफेरच्या मराठ्यांनीं दगा देऊं नये म्हणून विजापुरीं पोहोंचेपर्यंत आपल्याला शिवाजीशीं दिलजमाईच दाखविली पाहिजे.

**फाजलः**—अच्छा, अच्छा, जशी आपकी मर्जी. इथं नाहीं तर विजापुरीं पण माझा सूड उगवूं द्या. [ पडद्यांत-शिवाजी महाराज-निगा रक्खो मेहेरबान ] हा आला पहा माझा दुष्मान.

**जौहर**—दिमाख तर पहा. तहासाठीं नाक घांशित माझ्या कदमाकडे येतांनासुद्धां ताजीम पुकारीत येतो आहे! फाजलसाहेब, हुशियार रहो. खबरदारीकेसाथ बात करना. समझ लिया? [ शिवाजीचा वेष धारण केलेला हिरोजी, अनाजी व दोन मराठे शिपाई येतात ] आईये. मेहेरबान आईये. तशरीफ लाईये.

**हिरोजी**—सलाम आलेकुम—

**जौहर**—आलेकम सलाम. राजांची भेट झाली, दिल खुश झाला. मनांत कांहीं एक घोर धरूं नये. बरोबरचीं माणसं कबुलीप्रमाणं जाऊं द्यावीं.

**हिरोजी**—अनाजी दत्तो, तुह्मी तिघेही निघून जा आणि आह्मीं इथं सुखरूप पोंचलों असं आमच्या कबिल्याला कळवा. [ अनाजी व शिपाई मुजरा करून जातात. ] खानसाहेब, आतां मी एकटा आहे. झालं आपल्या मर्जीप्रमाणं?

**जौहर**—अझून नाही. राजाजी, नाराज होऊं नका. पण शिपायाकरवीं आम्हांला आधीं झडती घेतली पाहिजे. नाहींतर आलिशान खानेअज्जम अफझुल-खानांना जसा दगा दिलात, तशीच कांहीं करामत करून आमचीही फसगत कराल. दगा मिळाला याची याद आम्हीं विसरलों नाहीं.

**हिरोजी**—तुमच्या तहाप्रमाणं आह्मीं तीनच माणसं घेऊन आलों. तुमच्याच मर्जीप्रमाणं आतां त्यांना परतही धाडलं. याउप्पर आणखी झडती कसली घेतां?

**जौहर**—राजेसाहेब, हा सलाबतजंग शिद्दी जौहरचा शामियाना आहे. तहाची वाटाघाट होण्यापूर्वीं आमची बात तुह्मां मानलीच पाहिजे.

**हिरोजी**—मानलीच पाहिजे? या शिवाजीला तुह्मीं हा दरडावणीचा हुकूम करतां आहां का?

**जौहर**—हां–हां–शिवाजीलाच हुकूम करतों आहों. वेढ्याच्या पकडींत नरडी दाबल्यानंतर नांगी टाकून या शिद्दी जौहरच्या कदमापाशीं कुर्निसात करीत आलेल्या या भोंसल्याच्या अवलादीला दरडावित आहों.

**हिरोजी**—खामोष ! हा शिवाजी मराठ्यांचा बादशहा आहे, हें लक्षांत घेऊन सीधी बात करा. नाहींतर–[ जंबियाला हात घालतो ]

**जौहर**—हां, हां राजेसाहेब, आस्ते–आस्ते. तो जंबिया उतरून ठेवा. जमादार ! [ जमादार येतो ] नाइलाज आहे. राजेसाहेब, जंबिया जमादाराच्या हवालीं झालाच पाहिजे. नाहीं तर सक्तीनं काढून घ्यावा लागेल.

**हिरोजी**—मी एकटा असलों तरी तुम्हां दहांना भारी आहें, हें ध्यानांत ठेवा. पण जंबिया फेंकून तुमचा दिल थंडा होत असेल तर हा घ्या.

[ जंबिया फेंकून देतो ]

**फाजल**—तशीच ती समशेर आमच्या सुपुर्द करा.

**हिरोजी**—कधींही नाहीं. मराठ्यांचं हें हत्यार विजापूरच्या सुलतानाला काय–पण स्वर्गींच्या देवाला देखील काढून घेतां येणार नाहीं.

**जौहर**—राहूं द्या–फाजलभाई !–ती समशेर राहूं द्या त्यांच्याजवळ. एवढे जवानमर्द गराडा देऊन उभे राहिले असतांना टीचभर पोलादाची काय कदर ? राजेसाहेब, आह्मीं रमल जाणतों. त्या रमलच्या जोरावरच ही आजची मुलाखत आह्मीं घडवून आणली. आपले हात जरा पुढं करा, खुदातालानं आपल्या तकदीरीं काय लिहिलं आहे तें आह्मांला पाहूं द्या.

**हिरोजी**—हं हं हं ! खानसाहेब, असे भिऊं नका. आह्मीं आज वाघनखं आणलीं नाहींत. हे पहा हात.

**जौहर**—बहोत अच्छा ! राजेसाहेब, या असे या–या दिन्हानावर बसा. आपल्या खिदमतींत कोणत्याही प्रकारें कसूर केली जाणार नाहीं. योग्य इतमामानं आपली बरदास्त ठेवण्यांत येईल. मात्र पन्हाळ्याचा ताबा मिळेपर्यंत आपल्याला इथून हालतां येणार नाहीं.

**हिरोजी**—होय, याच अटीवर आह्मीं मुलाखतीला येण्याचं कबूल केलं होतं बरं, यापेक्षां आणखी कांहीं अटी ?

**जौहर**—अशा तडकाफडकीं सार्‍या अटी कशा सांगतां येतील ? आस्ते आस्ते बातचित होऊन जाईल.

**हिरोजी**—माझीही तीच इच्छा आहे.

**जौहर**—राजेसाहेब, विजापूरच्या दरबारी दसहजारांच्या मनसबदारीवर आपली चाकरींत नेमणूक व्हावी, असं सुलतान खुदावंतांनी फर्मावलं आहे तेव्हां आपला मनसुबा काय आहे हे आधीं समजलं पाहिजे.

**हिरोजी**—शहाची आम्हांवर मोठी मेहेरबानी झाली. खानसाहेब, नुसत्या शिपाईगिरीवर खूष राहणारा मी–मला एवढी मोठी जहागिर मिळाल्यावर आणखी काय पाहिजे ?

**फाजल**—राजेसाहेब, ही जहागीर तुह्मांला मोफत मिळत नाही, तर त्या मोबदला आज तुमच्या ताब्यांत असलेला सर्व मुलूख आणि नवे जुने सर्व किल्ले तुह्मीं आमच्या हवालीं केले पाहिजेत.

**हिरोजी**—ही अट मोठी कठीण आहे. खानसाहेब, हजारो मराठ्यांचं रक्त खर्ची घालून मी ही माझी दौलत आणि किल्लेकोट उभारले आहेत. खुदावंत सुलतान साहेबांची मर्जी सुप्रसन्न व्हावी ह्मणून मी माझ्या किल्ल्यांपैकीं फार फार तर पन्हाळा आणि रांगणा हे दोन किल्ले मोठ्या आनंदानं विजापूरच्या सलतनतींत सामील करून द्यायला तयार आहे—

**फाजल**—तें कांहीं नाहीं. बादशहांच्याच मनसुब्याबरहुकूम तुह्मी वागलं पाहिजे. राजेसाहेब, आमच्या मर्दुमकीच्या बळावर आम्ही तुह्मांला तह करायला भाग पाडलं आहे. आणखी एक दिवस गेला असता तर पन्हाळ्याचा धुव्वा उडवून तुमच्या नकली मराठेशाहीचं नांवसुद्धां आह्मी शिल्लक ठेवलं नसतं.

**हिरोजी**—आपली मागणी फार जबर आहे. देणारा तरी देऊन काय देईल ? देहांतलं रक्त जिथं दौलतीच्या कामा खर्ची पडलं आहे, जिथं जिवाच्या मोलानं जहागिरी उभारल्या आहेत, तिथं एका दमासरशी सारी जहागीर हुजूरच्या सुपुर्द करावी असं मी एकट्यानं ह्मटलं, तर माझे साथीदार उलटून मला नामोहरम करतील.

**जौहर**—त्याला आमचा नाइलाज आहे. आम्ही खावंदांचे बंदे–हुकमाचे ताबेदार. खावंदांच्या अटी आपण कबूल केल्या नाहींत, तर विजापुरीं खाविंदांच्या कदमांजवळ आपल्याला येणं भाग पडेल. त्यांत बिलकुल मुलाजा होणार नाहीं. कोणत्याही प्रकारचा खासगी इतमाम न घेतां आह्मीं



**हिरोजी**—मराठेशाहीचे संस्थापक असे सहजासहजीं कैद होत नसतात—

फोटोग्राफर्स—पाठक ब्रदर्स—नागपूर. [ पृष्ठ ७७

सांगूं त्या रीतीनं आमच्याबरोबर येऊन खाविंदांची तुह्मी जातीनं खात्री करून द्यावी लागेल.

**हिरोजी**—छे ! छे ! ! या अटी आमच्या इभ्रतीला नामुष्की आणणाऱ्या आहेत. आह्मी खुषीनं सर्वच राज्य बिनदिक्कत सुपुर्द करूं असं कधींही होणार नाहीं.

**फाजल**—मग त्याशिवाय हा तहही होणार नाहीं.

**हिरोजी**—अरे, पण हा तह आहे की तहाचं सोंग ?

**जोहर**—खरोखरच हे तहाचं सोंग आहे आणि अंदरकी बात म्हणजे ही आमची जबरदस्ती आहे. आम्हीं बोलूं तेंच अमलांत आणूं. राजेसाहेब, आपण राजे आहों असा तुमचा गैरसमज असेल, तर तो झूट आहे. तुम्हीं आतां आमचे कैदी आहांत आणि तुमचा मुलुखही आतां आपोआप आमच्या ताब्यांत आला आहे.

**हिरोजी**—मराठेशाहीचे संस्थापक शिवाजीमहाराज असे सहजासहजीं कैद होत नसतात–कुणाच्याही हवाली होत नसतात.

**जोहर**—वाऱ्या मोलाचे हे फुके बोल पिंजऱ्यांतल्या पढवल्या पोपटाहून आह्मांला जादा किंमतीचे वाटत नाहींत. आतां एकदम तोंड बंद करा. जबानींतून उपमर्दाचा बोल आला तर जीभ छाटली जाईल. शिवाजी !—[ पडद्यांत पुतळा –दादा, दादा, घात झाला, धांवर धांव !—] [ शिपाई येतो ] ही कोण मराठा औरत बाहेर ओरडते आहे ? कांहीं दगा तर नाहीं ?

**शिपाई**—ही खुणेची आंगठी घेऊन बाहेर एक बुरखेवाली औरत दौडत आली आहे.

**फाजल**—जा, जा. तिला एकदम आंत पाठवून दे.—कोण आहे औरत ? आणि ही आंगठी तिच्याजवळ कशी आली ?

**जोहर**—खरोखरच कांहीं दगा तर नाहीं ?

**हिरोजी**—[ स्वगत ] माझी गजरा तर नव्हे ही ?

**पुतळा**—[ बुरखा घेऊन प्रवेश करून ] दादा, दादा, धांव लवकर ! घात झाला माझा.

**जोहर**—ए लवंडी ! कोण तुझा दादा ?

**पुतळा**—[ हिरोजीला कवटाळून ] माझ्या घरधन्यांना बाजीप्रभूनं तुरुं-गांत टाकलं !

**हिरोजी**—मूर्ख पोरी, कोण आहेस तूं ? एकदम इथून चालती हो ?

**पुतळा**—दादा ! दादा ! हें काय करतोस ? भलत्या वेळीं हें वेड काय मांडलं आहेस ? माझ्या पतीचे प्राण जायची वेळ आली असतां हीं सोंग ढोंगं तुला सुचतात तरी कशीं ?

**हिरोजी**—मराठेशाहीच्या या शिवाजीसमोर अशी फाजील बेअदबी नामंजूर आहे. इथून एकदम चालती झाली नाहींस, तर या समशेरीनं गर्दन छाटून टाकीन.

**फाजल**—खानसाहेब, इथं खात्रीनं कांहीं तरी दगा आहे. बाई, ही खुणेची आंगठी तुझ्यापाशीं कशी आली ?

**पुतळा**—कशी म्हणजे ? मी काळूजी जाधवांची बायको आहे. त्यांनींच ही आंगठी माझ्याजवळ देऊन ठेवली होती. ते विजापुरकरांचे दोस्त आहेत म्हणून बाजीप्रभूनं त्यांना तळघरांत कोंडून टाकलं आहे. म्हणून म्हणतें, दादा, धांव रे धांव आधीं आणि त्यांची सुटका कर !

**जौहर**—राजेसाहेब, ही तुमची बहीण आहे ही बात सच आहे ?

**हिरोजी**—मुळीच नाहीं. साऱ्या जन्मांत मीं हिला कधींच पाहिलं नाहीं.

**पुतळा**—दादा-दादा-कसंरे असं धडधडीत खोटं बोलतोस ? खुद्द शिवाजी महाराजांनीं तुला आपला पोषाख देऊन इकडे पाठवलं. दोघे समोरासमोर उभे राहिलांत तेव्हांच मी पाहिलं होतं. घरधन्यांना बाजीनं कैदेंत टाकल्याचं कळलं तेव्हांच संधी साधून मी माझ्या पतीच्या बचावासाठीं तुझ्याकडे धांवून आलें, आणि अशा वेळीं असा कठोरपणा तुला करवतो तरी कसा ?

**हिरोजी**—[ स्वगत ] शिव-शिव ! हिच्या बेअकली नादानपणामुळं आतां दौलतीवर पुन्हां संकट येणार !

**जौहर**—राजेसाहेब ! आपण खरोखरच राजे आहांत का ?

**पुतळा**—अहो, हे राजेसाहेब नव्हेत हो नव्हेत. खरोखर हा माझा दादा आहे.

**जौहर**—हासमसाहेब !—[ तो येतो ] या राजेसाहेबांना एकदम काढण्या लावा.

**हासम**—[ त्याच्याकडे पाहून ] राजेसाहेब ? अहो, हा तर माझी मराठा औरत पळवणाऱ्या हिरोजी नाइकागत दिसतो आहे.

**पुतळा**—होयहो होय. माझा दादा हिरोजी नाइकच हा.

[ कासम धांवत येतो ]

**कासम**—खानसाहेब, धांवा धांवा. बाजी प्रभूसह थोडेसे मावळे घेऊन खरा मराठा शिवाजी आपल्या गाफील फौजेंतून अवचित् वेढापार झाला! धांवा, धांवा.

**जौहर**—या अल्ला! गफलत झाली! कशी माझी अक्कल गेली? पाहातां काय? पठाण, एकदम याची गर्दन उडवा.

**हिरोजी**—खबरदार! आधी तुम्हां सर्वांचे मुडदे पाडीन, तेव्हांच माझी गर्दन मारूं देईन. [ लढतात ]

**जौहर**—फाजलसाहेब!-पहातां काय?—डंक्यावर टिपरी टाकून फौजेला एकदम कुच करण्याचा हुकूम द्या. शाबास—पठाण—शाबास.

[ नौबत वाजते. फाजल जातो. लढतां लढतां हिरोजीचा जिरेटोप पडतो. तो उचलून घेऊन पुतळा पळत जाते. हिरोजीची तरवार उडते व तो वार लागून पडतो. ]

**हिरोजी**—[ पडतां पडतां ] अरेरे! हें काय झालं?

**जौहर**—या-या शिद्दी जौहरशीं ठगबाजी करणाऱ्याचा मुडदा पडला.

[ गजरा धांवत येऊन हिरोजीची तरवार उचलते. ]

**गजरा**—पण पतीचा प्राण घेणाऱ्या वैऱ्यावर मराठ्यांच्या मुली कशा चवताळून तुटून पडतात, हें दाखवण्याकरतां ही पहा गजरा धांवून आली.

[ लढाई चालू होते ]

**हिरोजी**—गजरा-गजरा-हें काय मांडलं आहेस?

[ गजरेला वार लागतो ]

**गजरा**—[ पडतां पडतां ] धनी, सहगमनासाठीं धांवून आलें. महाराज वेढापार झाले. आतां आपण सुखानं स्वर्गी जाऊं या.

[ हिरोजीच्या देहावर पडते. फाजल येतो. ]

**फाजल**—खानसाहेब, शिवाजी विशाळगडाच्या रोखानं दौडतो आहे. मीं त्याच्या पाठीवर रिसाला धाडला आहे. चलो, जलदी करो.

**जौहर**—कुछ फिकीर नहीं. या शिद्दीपुढं तो किती पळ काढतो तेच मला पाहायचं आहे.

[ धांवत जातात ]

---

## प्रवेश ३ रा.

[ जिरेटोप घेऊन पुतळा धांवत येते. ]

**पुतळा**—जळो ही माझी नुत्सद्दीगिरी—या मुत्सद्दीगरीच्या भरीं पडले आणि माहेर आणि सासर दोन्हीही गमावून बसले. घरधन्यांच्या नादानं प्रत्यक्ष भावाविरुद्ध कारस्थान केलं; पण आतां तें माझ्याच गळ्याशीं आलं. नुसतं माझ्याच गळ्याला आलं असतं, तरी सोसलं असतं, पण एवढा डोंगराएवढा भाऊ जायचा जाऊन कपाळीचं कुंकूंही रहातं की नाहीं याची भ्रांत पडली. शिपायाची बायको—शिपायाची बायको—ह्मणून भावजयीशीं हेवादावा केला आणि आपल्याच हातानं मी चांडाळणीनं सगळ्या संसाराचा खेळखंडोबा करून घेतला. पतीबरोबर जीव देऊन तिचं बिचारीचं सोनं झालं; पण मी मात्र माझ्या घरधन्यांच्या घरबुडव्या मसलतीनं घरधन्याबरोबरच कुठल्या दुर्गतीला जाणार आहे, देव जाणे ! पतीची आज्ञा प्रमाण ह्मणून सारे सांगत आले म्हणून पतीआज्ञेप्रमाणें मी अशी वागत आलें; पण बायकांनीं पतीचं काय ऐकायचं आणि काय ऐकायचं नाहीं हें मात्र मला खुळीला कळलं नाहीं. आतां त्यांना तिकडे पन्हाळ्यावरच ठेवलं आहे की स्वारीबरोबर नेलं आहे, तें कोण सांगणार मला ? आग लागो यांच्या मुत्सद्दीगिरीला ! आपलं शिपायाचंच जिणं बरं. स्वतःवर भार नाहीं—जोखमाचा काहार नाहीं. नुसत्या सेनापतीच, हुकूम पाळावयाचा सोडून देऊन हीं मुत्सद्दीगिरीचीं नसतीं कुलंगडीं उचलून खांद्यावर घेतलीं आणि मान मात्र पार मोडून गेली. तरी देवानं बुद्धि दिली की, गर्दींत हा जिरेटोप उचलून आणला. हा नेऊन महाराजांच्या पायापाशीं पोंचवतें. मग आलीच दया त्यांना तर भाग्य माझ्या अहेवपणाचं, नाहीं तर नवरा असून नसल्यासारखें झालंच आहे—( पाहून ) अगबाई, हा भाला कुणाचा ?

**मराठा शिपाई**—कोण तें ? बाई, तुह्मी मराठ्याच्या दिसतां. वैऱ्याची फौज मागं भिडलेली आणि या भयाण रात्रीं चाललांत कुणीकडे ?

**पुतळा**—वैऱ्याच्या पायदळीं पडलेलं हं देवाचं लेणं घेऊन थोरल्या आईसाहेबांकडे पोंचवलं पाहिजे ह्मणून मी विशाळगडीं चाललें आहे.

**शिपाई**—हं काय ? हा जिरेटोप ? वाः ठीक झालं. मी वर्दी द्यायला विशाळगडींच पुढं जातों आहे. या, पळा लवकर माझ्याबरोबर. थांबूं नका की मागं पाहूं नका.

**पुतळा**—मी नाहीं मागं पहात—पण तुह्मीं मात्र पहा. नाहींतर नेमके शत्रु पाठीशीं भिडायचे. कांट्याकुट्यांतून पळूं तरी कशी आतां ! जळो ही मुत्सद्देगिरी ! [ दोघं पळत जातात ]

## प्रवेश ४ था

[ जौहर, फाजल व शिपाई येतात ]

**जौहर**—पाहातों आतां तो सैतान शिवाजी कुठें जातो तें ! जमादार, फौज दौडती राहूं द्या. मराठ्यांच्या फौजेची गांठ पडतांच एकदम गर्दीची वर्दी द्या. जेजालांचे ताफे बिनीला ठेवा आणि बेफाम गोळे सोडा. हरएक शिपायाला सांगा, कीं जान कुरबान करून लढाल तर बहिश्तीच्या पऱ्या आज तुमच्यासाठी हात पसरून उभ्या आहेत, त्यांचा दिल थंडा होईल. गोळ्यामागं गोळा—कडाबिनींची फैर यांचा असा गोल मचावून द्या, कीं झाडाच्या फांदीला पानसुद्धां राहतां कामा नये. तोबा—तोबा—हा शिवाजी बिलकूल सैतान आहे. ! खोटा शिवाजी करून त्यानं आह्मांला फसवलं अं ? फाजलभाई, तुमची तरी अक्कल कुठें गेली होती तेव्हां ?

**फाजल**—माझी अक्कल जहान्नममध्यें गेली—पण तुम्हांला कसं कळलं नाहीं ? माझ्या वालिदांना ज्यानं फसवलं त्याच्या तहाच्या बोलण्यावर तुह्मीं भरंवसा कसा ठेवला ? माझ्या वालिदांची हकिगत तुम्हांला माहित नव्हती ? कळून सवरून डोळे झांकले आणि आतां आपल्याबरोबरच माझंही तोंड काळं केलं.

**जौहर**—फाजलसाहेब, तुमच्या गोऱ्या मुखड्याला ती तसली बात

पसंत नव्हती तर वक्तीं तशी सल्ला द्यायची होती ! आतां ही अक्कल कुठून सुचली ? तुम्हांसारखे शिकारीचा वखत गेल्यावर सल्ला देणारे दोस्त मिळाल्यावर माझ्यासारखा गाझी तरी काय करील ? तुह्मी शिवाजीला पूर्वी एकदां समोर पाहिला होता—ही लबाडी तुह्मांला सहज उमगायला पाहिजे होती.

**फाजल**—जौहरसाहेब. असा बेगुन्हा माझा पाणउतारा करायचा असेल तर याच पावलीं विजापुराला परत जाईन आणि तुम्हीं लांच खाऊन शिवाजीला पळवून लाविला अशी वर्दी दरबारीं पेश करीन.

**जौहर**—कंबख्त ! अल्लाची भीती नसली तरी तुला तुझ्या जिवाची पर्वा आहे कीं नाहीं ? हकनाहक असा माझ्या तोंडाला काजळ फांसशील तर आपला परावा ह्मणणार नाहीं—माझ्या कर्नाटकी शिपायांकरवीं तुझे राई राई एवढाले तुकडे करीन. मी नांवाचा जौहर आहें हें ध्यानांत ठेव.

**फाजल**—जौहरसाहेब, उगीच असं आपसांत भांडण्यांत काय फायदा ? तुह्मीं तेढी बात बोललांत—मला घुस्सा आला—दोन तेढे जाब मीही बोलून गेलों, हें बरं नाहीं. आपणच एकमेकांवर समशेरी उपसल्या तर शिवाजीचं आयतंच काम होईल. जौहरसाहेब, तुम्हाला आपला बडेजाव वाढवायचा आहे पण मला शिवाजीचा सूड घ्यायचा आहे. कियामतीच्या दिवशीं खुदातालाच्या पायाशीं उभा राहिलों आणि माझ्या वालिदांनीं सुडाचा जाब पुसला, तर जबाब काय देऊं ?

**जौहर**—दोस्त, माफ करा. रागाच्या भरांत मीही तेढी बात बोलून गेलों त्याची माफी करा. परवरदिगारच्या आदेशानें आपल्या दोघांची किसमत एका दोऱ्यानं जखडली आहे, ती आतां दूर होणं मुष्किल आहे. हातांत हात घालूनच आपणाला त्या सैतान शिवाजीचा फन्ना उडवला पाहिजे. [ शिपाई येतो ]

**शिपाई**—खुदावंत, अफसोसकी खबर है ! शिवाजी आपल्या सैन्यासह विशाळगडच्या रस्त्यानं पळून जातो आहे. त्याचं सैन्य दिसूं लागलं आहे. आपण दौड करूं तर हांहां म्हणतां त्याला गाठूं.

**जौहर**—तुझी खात्री आहे, कीं त्यानं विशाळगडचीच वाट पकडली आहे ?

**शिपाई**—हां जहांपन्हां. मीं अगदीं नजरेनं पारखून घोडा दौडत आलों आहे.

**जोहर**—चलो, फाजलसाहेब, आतां मौका आला. एकदम गर्दी करून लगट करा आणि दुष्मनाच्या फौजेचा धुव्वा उडवून द्या. जो शिपाई आज पडेल तो बहिश्तीं जाईल आणि जो जिंदा राहून दुष्मानाला चोप देईल त्याला पैशाची खैरात मिळेल, असा फौजेंत पुकारा करा. तुह्मींही आज मर्दुमकीची शिकस्त करा आणि मराठ्यांचं नांव नेस्तनाबूत करून सोडा. खुदातालाची नेकनजर तुमच्या समशेरीला पाणी देईल. दौडा !—फैरीवर फैरी सोडा !—बोलो दीन—दीन—दीन ! [ तोफांची सरबत्ती सुरू होते. ]

---

## प्रवेश ५ वा.

[ **स्थळ**:—पावन खिंड—पांढरें पाणी. पात्रें—शिवाजी, बाजी, अनाजी ]

**बाजी**—मराठेशाहीच्या राजा ! आतां विचाराला अवधी नाहीं. काळाचा घाला जवळ आला. वैऱ्याच्या तोंडावर हिरोजीचा बळी टाकून संकटमुक्त होण्याचा आपला डाव अपुरा पडला. वैरी चंद्रजोती पाजळून पाठलाग करीत अगदीं पाठीशीं भिडला. कांहीं तरी निश्चय केल्याविना आतां गत्यंतर नाहीं.

**शिवाजी**—बाजी, आतां निश्चय तरी कसला करावा ? पुढं पळावं तर शत्रू पाठीवर आला. तोंड द्यावं तर वैरी भारी पडला. विशाळगडीं आह्मीं सुखरूप पोंहोंचूं हा भरंवसा पार मावळून गेला. आभाळ कोसळून पडलं.

**बाजी**—धनी, जिवाला जीव देणारे आह्मीं नेकीचे नेकदार बरोबर असतां असे मेरूमांदाराला हादरे बसल्यागत करूं नका. पाइकांनीं देह सांडावे आणि त्यांचे देहाच्या पायऱ्यांवरून दौलतीनं चढून जावं, हें राजकारणाचं ब्रीदच आहे. आह्मीं चाकरांनीं दौलतीसाठीं जीव सांडले नाहींत—धारातीर्थी स्नानं केलीं नाहींत, तर कोणत्या पुण्याईच्या सांठवणीनं आह्मांला स्वर्ग लाभणार ?

**हेर**—[ प्रवेश करून ] हुजूर, हुजूर, वैरी अगदीं पाठीशीं भिडला. हा पहा, बिनीचा डंका झडूं लागला. झुंज दिल्याविना आतां गत्यंतर नाहीं.

**बाजी**—हरकत नाहीं. अनाजी, असेच पिछाडीवर जाऊन रिसाल्याच्या जमादाराला हुकूम सांगा की, झुंजेला तोंड देऊन दुष्मनाला जोरानं आडवून धरा. जिवाची तमा धरूं नका. खासा स्वारी बरोबर आहे हे विसरूं नका. पिछाडीच्या प्याद्यांना भवानीचं नांव घेऊन हिंमत चढवा! रस्ते रोखून धरा. खिंडीच्या तोंडापर्यंत दुष्मनाला प्राण गेल्याशिवाय येऊं देऊं नका.

[ अनाजी जलदीनं जातो. ]

**शिवाजी**—शाबास बाजी! बिनमोल योजना केलीत. पिछाडचिं शेवटचं प्यादं पडायच्यापूर्वीच आतां आपल्याला जिवाची मात करून पुढची मजल गांठली पाहिजे. चला त्वरा करा.

**बाजी**—मजल गांठूं; पण मुक्काम गांठतां येणार नाही. महाराज, ही पहा अगदीं जवळून नौबत ऐकूं येऊं लागली. दुष्मन आतां दूर नाहीं, वैऱ्यांनी दावा साधला. काळजाचं कसं पाणी होतं! [ पुन्हां तोफ होते ] नाहीं—आतां विचारच करायचा नाही. महाराजांनी थोड्या शिबंदीनिशी पुढं विशाळगडीं जलदीनं कूच करावं तोवर ही पावनखिंड मी लढवतों. खिंडीच्या तोंडाला मुडद्यांचा खच घालून दुष्मनांची पाऊलवाट बंद करतो. पण महाराजांनी मात्र आतां पळाचाही विलंब लावूं नये.

**शिवाजी**—काय ह्मणतां बाजी? मावळमराठ्याघरचं एकएक मोहरं एकसारखं खर्ची पडत असतां आमच्या जिवापायीं आह्मीं वारेमाप मागं पाय काढावा? पावनखिंडीच्या या डोंगरतोंडीं, पाठीच्या भावागत पृथ्वीमोलाचे तुम्ही जीव, मातीमोलानं मरून जात असतां उद्यां हिंदुपदपादशाहा म्हणून मिरवण्यासाठीं विशाळगडाचा निवारा गांठावा? नाही—बाजीराव, अशा प्राणांतकाळीं तुह्मांला सांडून या शिवाजीचं पाऊल एक रेसभरही मागं सरणार नाही. सुखाच्या काळी धनी आणि चाकर, पण लढाईला रणांगणांत खांद्याला खांदा भिडवून लढणारे दोन वीर, हेंच आपलं खरं नातं. समशेरीला समशेर, हाताला हात, खांद्याला खांदा भिडवून वैऱ्याशीं निकराचं तोंड देत देत या झुंजेंत एक जयश्री तरी मिळवूं किंवा जगदंबेची तशीच इच्छा असेल तर दोघेही इथंच धारातीर्थीं देह तरी सांडूं. पण माघार!—केव्हांही नाहीं.



**बाजी**—महाराजांना मात्र आतां पळाचा विलंब लावूं नये.

फोटोग्राफर्स—पाठक ब्रदर्स—नागपूर. [ पृष्ठ ८४

**बाजी**—नका, मायभूमीच्या पंचप्राणा, असं बोलूं नका. असा धारातीर्थी देह सोडायचा निर्धार करून मायभूमीला मृतवत् कळा येईल अशी कल्पनाही उच्चारूं नका. अशा ह्या राजबिंड्या जिवाशिवाचा समरांगणी बळी द्यायचा मग आम्ही मराठकुळीचे अठरापगड वीर एके ठायीं जमलो कशाकरतां ? नका—मराठकुळींच्या स्वातंत्र्यदीपका, असं जिवावर उदार होऊं नका. आमच्यासारखे लाख गेले तरी लक्षावधी मिळतील; पण लाखोगणतीं स्वकीयांचा राखणदार गेला तर हिंदुस्थानांत हिंदू उरणार नाहीं. या विपत्कालाचा मनीं मेळ घाला आणि आधी विशाळगडाचा मार्ग धरा.

**शिवाजी**—बाजीराव, लाख गेले तरी लाखाचा राखणदार जाऊं नये; पण लाखांच्या संरक्षणकर्त्यानं पाषाणहृदयीही होऊं नये. आम्हांपायी हिरोजी वैऱ्याघरीं बळी पडला. सौभाग्याचा बळी पडला म्हणून गजरेनं परलोकचा मार्ग धरला आणि आतां तुम्हीही आम्हांला सोडून मृत्यूला कवटाळायला सिद्ध झालांत ! हें सगळं सोसायचा निर्दयपणा मी कुठून आणूं ? नेकीच्या नेकदार बाजीराया ! विधात्यानं माझ्या हृदयाची घडणच कठोर घडली नाहीं, त्याला मी तरी काय करूं ?

**बाजी**—राजा, आपल्या हृदयाची घडण विधात्यानं मायाळू घडवली आहे, म्हणूनच हा मराठ्यांचा मायाळू मायबाप राजा उदंडकाळ महा-राष्ट्राला लाभावा म्हणून या चाकराचा जीव तळमळतो आहे. आतां क्षणमात्र मायाळूपणा सोडून राजे विशाळगडी गेले नाहीत तर वैऱ्यांनी इथवर येऊन दावा साधल्याचा विपरीत प्रसंग पहाण्याचं नशिबीं येईल. त्यापेक्षां या समशेरीनं स्वतःचीच गर्दन उतरून घेण्या-इतका त्रागा जिवाला होतो आहे. महाराजांचं संकट पहायला या बाजीला डोळे नाहींत मायबाप.

**शिवाजी**—हरहर, काय प्रसंग हा ! नको, नको हें राजकारण ! परमे-श्वरा, हिंदुपदपादशाहीच्या सिंहासनापायीं आणखी अशा किती वीररत्नांच्या रक्तमांसाचा या शिवाजीच्या निमित्तानं खच घालणार आहेस ! आणखी किती मायबहिणींचीं साजरीं कपाळं पांढरीं फटफटीत करणार आहेस ?

[ नौबत पुन्हां वाजूं लागते. ]

**बाजी**—हुजूर, काळाचा घाला जवळ आला. आतां विलंब लावूं नये.

**शिवाजी**—ठीक आहे. नाहीं लावीत विलंब. तुमचा मृत्यू डोळ्यांसमोर दिसत असतांही, वैरी तुमच्या देहावर शस्त्रांचे घावावर घाव घालतील हें कळूनही, अगदीं निष्ठुरागत विशाळगडी चालते होतों. पण बाजीराव, जीव माया सांडीत नाहीं म्हणून सांगतों कीं, एकवार कडकडून तुम्हांला भेटूं द्या. [ शिवाजी बाजी भेटतात ] जरूरीपेक्षां धाडस करूं नका.

**बाजी**—धनी, जगलों वांचलों तर विशाळगडीं चाकरीला रुजू होईनच; पण मेलो गेलों तर हाच या बाजीचा अखेरचा मुजरा. धनी विशाळगडीं सुखरूप पोंचल्याची खूण म्हणून पांच तोफांची सलामी व्हावी. तोफांचा आवाज ऐकूं येईपावेतों पावनखिंड झुंजते आहे असा विश्वास धरावा. मग वैऱ्यांनीं देह रक्तबंबाळ केला, जीव वेदनांनीं निस्त्राण झाला तरी पांचही तोफांचे आवाज कानीं ऐकल्याशिवाय बाजीचे पंचप्राण देह सांडणार नाहींत, हा निकरींचा भरंवसा समजून आधीं पल्ला गांठावा.

**शिवाजी**—जिवाचा थरकांप होतो, काळीज फुटून निघतं—बाजी, बाजी—येतो आम्ही.

**बाजी**—आतां मागं जीव गुंतवूं नका. महाराज, माय भवानी कधींही अंतर देणार नाही. [ शिवाजी मावळ्यांसह जातो ] गेला ? सुखरूप मार्गी झाला. आतां एकदां खुणेच्या तोफांचे आवाज कानी येईतोंवर समशेरीचे घाव सोसण्याचा सोशीकपणा माय भवानीनं या देहांत ठेवला कीं, या बाजीची बेफाम मरायची तयारी झाली. माझ्या समरांगणींच्या सोबत्यानों, तुम्हीही अशाच मरणाला आतां राजी व्हा. लढाईसाठीं रणांगणीं उतरणाऱ्या वीरांना सदाच मरणाला राजी रहावं लागत असलं, तरी प्रत्येकाला मृत्यू येतोच असं नाहीं. पण या खिंडींतली लढाई मात्र आतां अशी घनघोर लढावी लागणार आहे कीं, साता स्वर्गींच्या मोलाचा आपल्या राजांचा प्राण गडाच्या बंदोबस्तांत सुखरूप पावता होऊन, खुणेच्या तोफांचा गडगडाट ऐकूं येईतों आपल्या प्रेतांचा नुसता खच या पावनखिंडींत पडणार आहे. आपल्याहून आपल्या वैऱ्याचं बळ शतपटीनं भारी असलं, तरी मायदेशाच्या संरक्षणासाठीं उपसलेल्या आपल्या

समशेरींनीं पावलागणिक वैऱ्याच्या रक्ताचे पाट वाहवल्याशिवाय दुष्मनाला पाऊल-भरही सरकूं देणार नाहीं, असा निर्धार करा. आजची झुंज तुह्मीं यशस्वी झुंजलांत, तर मराठेशाहीची राजधानी तुह्मींच बांधलीत असं सारं जग ह्मणणार आहे. वैकुंठांचे दरवाजे उघडून देवांचे दूत तुमची मार्गप्रतीक्षा करीत उभे आहेत. तर चला, करा गर्जना, बोला, हर हर महादेव.

[ सर्व गर्जना करीत जातात. पडदा पडतो ]

---

## प्रवेश ६ वा

**जौहर**—वारे जंगबहादूर ! वारे मर्द शिपाई ! बहोत अच्छा. इसी मुआ-फिक-बिलकुल इसी मुआफिकही जोरसे हल्ला करो. खुदातालाके मेहेरबानीसे कियामतके रोजतक दुनियामें तुम्हारा नाम जिंदा रहेगा. वारे मर्द पठाण-बहोत अच्छा. बहोतही अच्छा-ये देखो मरगढ्ढे हटगये—और भी हट गये. ऐसाही थोडा तुम जंग मारोगे तो वह सैतान शिवाजी लोहेके जंजीरसे गिरफदार बनकर खुषीसे यह सलाबतजंग शिद्दी जौहर के साथ आदिलशाहीके तख्तको मुजरा करनेके लिये चला आयगा.

**फाजल**—ओहो ! ये क्या होगया ? वह देखो !—वह देखो काफिर बाजी देशपांडा, बडे जोरसे हल्ला करके आगे बढने लगा. जैसा के मालिके-ए-मैदानका गोला हमारे फौजपर गिर पडा.

**शिद्दी**—सैतान ठेहेर जा ! अबी ये जौहरकी समशेरही तुझको लहजेमें जहान्नममें भिला देगी. [ जातात. पडदा उचलला जातो. खिंडींत जोरानें लढाई चालली असून मुसलमानांना मराठे मागें रेटीत नेतात. बाजी मावळ्यांना प्रोत्सा-हन देत बेफाम लढत असतो. त्याच्या अंगावर कांहीं घाव लागून रक्ताचे डाग जागोजाग दिसत असतात. ]

**बाजी**—शाबास रणशूर मराठेहो, भले शाबास ! मावळ मराठ्यांचं नांव राखलंत-बेचाळिस पूर्वजांना पावन केलंत. हा पहा—वैऱ्यांनीं फिरून हल्ला चढवला. हुषार, हुषारीनं लढा. प्रेतांचा असा ढीग पडूं द्या कीं, दुष्म-नाला पुढं पाऊलच टाकतां येऊं नये-अहाहा ! [ बाजीला एक जोराचा

घाव अवचित लागतो ] अनाजी–अनाजी, आतां मात्र या बाजीला वर्मी घाव बसला. देह निस्त्राण झाला.–तोफ–खुणेची तोफ–अझूनही माझा राजा गडां सुखरूप पावला नाहीं का ? [ हरहर महादेवची व दीनदीनची गर्जना होते ] हा पहा–हा पहा–फिरून वैऱ्यांचा हल्ला आला. सोडा–सोडा मला. [ पुनः तरवार घेऊन शत्रुवर धांवून जातो. शिपाई त्याला धरून ठेवतात ] तोफ कशी नाही ? प्राण कंठीं आले–तोफ–विशाळगडची तोफ—

**अनाजी**—मराठेशाहीचे नेकजात मावळगडी हो, रणझुंजार बाजी प्रभू दुष्मनांच्या शस्त्रप्रहारांनीं घायाळ झाले. खिड झुंझविण्याची जबाबदारी आतां सर्वस्वी तुमच्या शिरीं आहे. तुमच्या सेनापतीच्या जखमांतून वहाणाऱ्या या रक्ताची जर तुम्हांला कांहीं चाड असेल, जातीवंत मराठ्यांचं रक्त जर तुमच्या अंगांत खेळत असेल तर आणखी थोडा वेळ दुष्मनाला रेसभरही पुढं येऊं देऊं नका. इतक्यांत खुणेची तोफ झालीच म्हणून समजा. मराठे मागं हटूं लागतात.

**बाजी**—अरेरे ! हं काय ? हा पहा–हा पहा शिद्दी जौहर आणि फाजल माझ्या मराठ्यांना कापीत पुढं येत आहे. सोडारे मला. या बाजीचा निर्धार अजूनही एवढा जबर आहे की, प्रत्यक्ष कृतांतकाळ–अगदीं यमदूत जरी समोर उभे टाकले तरी माझ्या राजांच्या सुखरूपतेच्या तोफेचा आवाज कानीं पडल्या-शिवाय या बाजीचे पंचप्राण देह सांडणं शक्य नाहीं. हा पहा बाजी फिरून शत्रुसैन्यावर तुटून पडला. [ बाजी मावळ्यांच्या हातून सुटून लढूं लागतो. मुसलमानाची फौज मागं हटते–अगदीं खिंडीपार होऊं लागते. बाजीला लढतांना ग्लानी येऊं लागते. ] अहाहा ! अनाजी, नाहीं–आतां ह्या रक्तबंबाळ शरीरानं लढवत नाहीं, प्राण कंठीं आले ! तोफ–खुणेची तोफ ! इच्छा राहून माणसाला मृत्यु येऊं नये म्हणतात. खुणेच्या तोफा ऐकल्याशिवाय या बाजीला मरण येऊन तोफ तोफ असा टाहो फोडीत या खिडींत—भूत होऊन वावरायचं दुर्भाग्य तर विधात्यानं माझ्या नशिबीं खरडलं नाहीं ना ? अनाजी, प्राण घोटाळले; बाजी चालला ! जगून वांचून परत गेलांत तर महाराजांना मुजरा सांगा. बाजीनं पावनखिडींत लढाईची शिकस्त केली

म्हणून सुचवा आणि तोफांचे आवाज ऐकण्यापायीं बाजीनं बळेंबळेंच इच्छाशक्तीच्या बळावर देहांत जीव कोंडून धरला; पण–[ इतक्यांत तोफ होते ] अहाहा ! ही ऐका माझ्या राजांच्या सुखरूपतेची तोफ, राजा, शिवराया ! आतां बाजी मरायला भीत नाही ! बाजीला स्वर्ग ठेंगणा दिसूं लागला. बाजीला वैकुंठीचा ठेवा लाभला. येतों अनाजी, महाराजांना सांगा, मरण्यापूर्वी बाजी देशपांड्यानं आपली नोकरी बजावली ! येतों. दंडवत ! जय शिवाजीमहाराज ! [ मरतो. इतक्यांत मावळे धांवत येतात. ]

**मावळा**—अनाजी, बहुतेक मावळे कापले गेले. शिद्द्यानं रक्तपात मांडला. शिवाजी राजे लढाईत पडल्याची खोटीच कंडी त्यांच्या फौजेंत पिकली आहे. तुम्हीं बाजीचं प्रेत पळवा, तोपर्यंत आम्ही शिद्दीला इथं अडकवून धरतों. [ अनाजी बाजीला पळवूं लागतो तोंच शिद्दी व फाजल येतात ]

**जौहर**—फाजलसाहेब ! वह देखो ! शिवाजी खतम होगया ! आपली फतेह झाली. बोलो दीन !

**फाजल**—क्या ? सैतान शिवाजी खतम होगया ? मेरे वालीदके खूनका बदला हमने ले लिया ?

**अनाजी**—जाबे उल्लूके पठ्ठे ! बदला घेतोय् ! ही ऐक तुझ्या टोलेजंग बापाचा मुडदा पाडणारे शिवाजी महाराज विशाळगडी सुखरूप पोचल्याची तोफ.

**जौहर**—फिर जंग मारा वह कौन था ?

**अनाजी**—शिवाजी महाराजांचा स्वामिनिष्ठ सरदार वीर बाजी प्रभू देशपांडे !

**फाजल**—हाय हाय ! यह क्या हो गया ? अभी हमारे वालीदके खूनका बदला ?

**जौहर**—या अल्ला परवरदिगार, आखर हमारी सब जंगबहादुरी बरबाद हो गई ! हमारा काला मूह अभी औरही काला हो गया !

**अंक ४ था समाप्त**

# परिशिष्टांक

## प्रवेश १ ला

[ विशाळगडावरील शिवाजींची छावणी. राघो बल्लाळ व अनाजी दत्तो ]

**राघो**—एवढ्या मोठ्या रणधुमाळीच्या वेळीं मी बाजूला गुंतून पडलों होतों, याचं मला खरोखरच फार दुःख होतं. बाजीप्रभूंनीं स्वामीकार्यापायीं देह खर्ची घातला हें पाहिलं, म्हणजे मनाला मोठी हुरहुर लागते. आपल्या दैवीं हें भाग्य नाहीं तर नाही; पण निदान हा प्रसंग पाहाण्याचं सौख्य तरी देवानं मला द्यायचं होतं !

**अनाजी**—खरोखरच, राघो बल्लाळ तो प्रसंग अपूर्व होता. जन्माला यावं आणि एकदां तरी असली रणधुमाळी पहावी ! त्या काळरात्रीच्या अनर्थपातांतून माझ्याखेरीज आणखी चार पांच इसम शिल्लक राहिले. प्रत्येक मर्दानं देह पडेपर्यंत वैऱ्याशी झुंज देतांना जे अपूर्व शौर्य दाखवलं त्याचं वर्णन करणं माझ्या शक्ती-बाहेरचं आहे. पडला तो बाजी-महाराज नव्हेत, हे त्या फाजलखानानं पाहिलं आणि जो कांहीं चेहरा केला, तो खरोखर अजून माझ्या नजरेसमोर आहे. एवढे हजारों बळी देऊन वैऱ्यानीं मिळवलं काय ? नुसता पन्हाळगड ! बाजीचा देह-सुद्धां आम्हीं त्यांच्या हातीं लागूं दिला नाही.

**राघो**—खुद्द महाराजांनी बाजीप्रभूचं उत्तरकार्य सारलं ! खरोखर वीरांनीं मरावं तर असं मरावं कीं, राजाचाच हात चितेला लागावा ! नाहींतर काय थोडे रणांगणावर मरतात ! पण हें मरण अति अलौकिक ! देवांनासुद्धां असल्या मरणाचा हेवा वाटावा.

**अनाजी**—यांत संशयच नाही. शिद्दी जौहरची एकंदर फटफजितीच झाली. किती दिवस विशाळगडा आसपास वळवळत बसला आणि शेवटीं परत फिरून कृष्णेपार निघून गेला. कुणी म्हणतात तो थेट कर्नूळासच गेला.

फाजलखानाच्या चिथावणीनं विजापुरच्या सुलतानाचीहि त्याच्यावर इतराजी झाली. कुणी म्हणतात कीं, खुद्द सुलतानानं त्याच्यावर चाल करून जाऊन त्याचा मुलूख खालसा करून घेण्याचा हुकूम सोडला आहे आणि त्याला पकडून आणून त्याचा शिरच्छेदही करणार आहेत. कांहींही होवो, आतां आपली बाजू निर्धास्त झाली यांत शंका नाहीं.

**राघो**—पण बाजीप्रभूंच्या मुलाला महाराजांनीं बोलावून आणलं आहे तें कशाकरितां ?

**अनाजी**—महाराजांचे बेत कधीं कुणाला कळत असतात ? आज खास दरबार व्हावयाचा आहे त्यांत सारं कांहीं आपोआप कळून येईल. ही ऐका, महाराज निघाल्याची नौबतही झाली. वेळीच आपण दरबारांत हजर व्हावं म्हणजे तिथंच सर्व गोष्टींचा उलगडा होईल. [ जातात ]

## प्रवेश २ रा

[ सर्व सरदार बसले असतां पडदा उघडतो. भालदारांची ललकारणी होते व जिजाबाई व शिवाजी महाराज आसनावर बसतात ]

**शिवाजी**—आईसाहेबांच्या आशीर्वादानं आजचा हा आनंदाचा दिवस उगवला. मायभवानीची कृपा म्हणूनच आईसाहेबांचे चरण आम्हांला दिसले; पण ज्याच्या शौर्यामुळं आजचा हा आनंदाचा दिवस उगवला तो वीर पुरुष मात्र आम्हांला जन्माचा अंतरला. आनंदाचा दिवस म्हणून उत्सवाचा दरबार भरवतांना डोळ्यांवाटे अश्रुबिंदु येतात; पण बाजीप्रभूंचं मरणच असं आहे कीं, त्यामुळं हिंदुमात्राला एक प्रकारच्या आनंदाचं भरतंच येईल.

**जिजाबाई**—यादवांचं सिंहासन पुन्हां स्थापन करावं म्हणून आम्हीं जिवाची मनीषा धरली, स्वराज्याच्या सिंहासनाची पायवाट पुढं दिसूं लागावी म्हणून, शिवबा, तुम्हीं हातीं तरवार धरली. आई जगदंबेच्या कृपेनं सहस्रार्जुनाच्या हातासारखी कोंकणमावळची करडीं माणसं जमा

झाली. तोरण्याचं तोरण बांधून आमच्या इच्छेचं तुम्ही पुण्याहवाचन केलं. आज बाजीप्रभूंनी या महाव्रताच्या सांगतेचा कळस चढवला. आज खात्री झाली की, मराठ्याचं राज्य पुन्हां उभं राहील. आज खात्री झाली की, हिंदुपदपादशाही तिन्ही त्रिलोकी नांव गाजवील—ज्यांनी खात्री दिली ते वीर बाजीप्रभू, हेर हिरोजी आणि सती गजरा मात्र स्वर्गी निघून गेली.

**शिवाजी**—एका हातानं डोळ्यांतलं आसवं पुसतांना, आशा दुसऱ्या हातांची समशेर घट्ट करते. आईसाहेब, आम्हांला आज काय वाटतं आहे, हें कुटल्या शब्दांनी बोलावं ? राज्याची आशा धरली, जय मिळवले, दुष्मानांना धाक बसला. पण बाजीप्रभूच्या प्राणसांडीनं काळजाला धक्का दिला. क्षणभर वाटलं कीं, कशाला ही राज्याची हांव ? आपल्यासाठीं सज्जनांनी पृथ्वीमोलाचे जीव खर्चीं घालावे आणि त्यांच्या मृत्यूवर आह्मी जगावं ? मित्राचं मरण तें आमचं जीवन ! असलं हे जिणं तरी काय कामाचं ? समोर शत्रू दिसतो, लढाईला तोंड देतो आणि जिवाभावाच्या मित्राला बळी देऊन आह्मीं सुखाची शेज पकडून स्वस्थ होतों. असं वाटतं की, नको हा असला प्रपंच ! पण याच वावरण्यानं धीर येतो. राज्याच्या प्रपंचाची हांव त्याचमुळं बळावते आणि स्वराज्याची मुहूर्तमेढ त्याचमुळं दृष्टीपुढं दिसूं लागते, स्मशानवैराग्य नाहींसं होतं आणि कर्तबगारीची जाणीव पुढल्या कार्याचा मार्ग दाखवते.

**जिजाबाई**—माय आणि मायभूमीच्या सेवेसाठी सरसावलेल्या वीराची पायवाट मखमली रुजाम्यांनी मढविलेली नसते. भाडोत्री नोकरांनीं जर तरवार मारली असती, तर आज विजापूरच्या दरबारचं तख्त कां डळमळलं असतं ? तिथं काय थोडे सरदार आहेत ? काय लढाईची सामुग्री नाहीं की फौजेचा तुटवडा पडला आहे ? मग जयाचा वांटा विजापूरकरांच्या वांट्याला कां येत नाही ? मूठभर माणसं, समुद्रासारखी फौज नुसती फुंकरीसरशीं उडवून देतात ती काय वर्षाच्या वेतनासाठीं ? नाहीं. शिवबा, तुमची माणसं तुमच्याइतकींच मोठी आहेत. तीं मोठीं आहेत म्हणूनच

तुमच्यासाठी जीव टाकतात आणि मोठी माणसं अशी तुमच्यासाठी जीव टाकतात ह्मणूनच तुह्मी सर्वांहून मोठे आहांत.

**शिवाजी**—असो-अनाजी दत्तो! बाजी प्रभूंचे चिरंजीव-

**अनाजी**—[ बावाजीला पुढे करून ] हे बाजी प्रभूंचे चिरंजीव बावाजी.

**शिवाजी**—बावाजी, तुमचं भाग्य काय वर्णावं? पुष्कळ वीरांनीं आजवर धारातीर्थीं देह ठेवले; पण तुमच्या वडिलांनी सर्वांनाच लहान केलं. स्वामिभक्त पुष्कळ झाले; पण असा स्वामिभक्त ह्याच, असं उद्यां इतिहास सुद्धां ह्मणत राहील. तुमचे वडील गेले नाहीत तर मरणानं मोठे झाले. त्यांनीं शिवाजीला सुद्धां लहानाहून लहान केलं. त्यांच्या भक्तीच्या ऋणांतून उतराई व्हायला आह्मी असमर्थ आहोत.

**बावाजी**—वडिलांच्या वियोगानं पुत्रांना दुःख होतं; पण आमच्या वडिलांनी आह्मांला दुःखाला जागाच ठेवली नाही. आमच्या मातोश्रींनीं कपाळीचं कुंकू अधिक करतांना दुःखाचा एक हुंदकाही दिला नाहीं. पोरस्वभावामुळं माझ्या डोळ्यांना पाणी आलं, तेव्हां मातुश्रींनीं कठोरपणानं आह्मां मुलांना दरडावून सांगितलं कीं, "स्वामिकार्यासाटी देहाचं दान देणाऱ्या वीरांच्या मुलांनी नेभळट आसवांनी वाडिलांच्या स्वर्गाचा मार्ग रोधूं नये." आह्मी डोळे पुसले, हुंदके आवरले-वैधव्यानं मलिन झालेल्या आमच्या मातुश्रींच्या मुखावर आनंदाचं हंसूं आलेलं दिसलं. जिथं दुःखाचा असा बडिवार, तिथं सांत्वनाची गरज कसली मायबाप?

**शिवाजी**—बावाजी, ऋणफेडीचा प्रश्नच नाहीं; पण आमचं कर्तव्य मात्र उरलं आहे ते करण्याची संधी घेतो. बाजीप्रभूंची सरदारी यापुढं तुमच्याकडे तशीच चालू राहील. दौलतीची यथायोग्य सेवा करून वाडिलांचं नांव वाढवा, हेच तुमच्यापाशीं आमचं मागणं आहे. त्याचप्रमाणं तुमच्या इतर बंधूकडे हिरडसमावळच्या सबनीशीचं काम देण्यांत येत आहे. राघोबल्लाळ, पोषाख आणि सनदा—[ राघोबल्लाळ थाळी पुढे करतो. शिवाजी महाराज त्याला हाताचा स्पर्श करून देतात. बावाजी त्याचा स्वीकार मस्तकाला स्पर्श करून करतो व मुजरा करतो. ]

**अनाजी**—महाराजांचा जिरेटोप शिद्दीच्या शामियान्यांतून पुतळाबाईनी आणला, त्यांचा सत्कारही आतांच व्हायची आज्ञा झाली होती. त्याप्रमाणं पुतळा-बाई हजर आहेत.

**शिवाजी**—त्यांना इथं घेऊन या. [ अनाजी जातो ] पुतळाबाई म्हणतांच हिरोजीची आठवण येते. [ पुतळा येते व जिरेटोप सिंहासनाजवळ ठेवून पायांवर डोकं ठेवून दोघांना नमस्कार करते. ]

**जिजाबाई**—सौभाग्यवती हो माझे मुली.

**अनाजी**—मासाहेब, ही त्या निमकहराम काळूजी जाधवाची बायको !

**पुतळा**—आईसाहेब, काय आपल्यासमोर बोलं ? पापानं न्हालेल्या जिवाला या पुण्याईच्या पायांनीं आज पावन केलं. दिला आशीवाद खरा व्हावा आणि माझ्या अभागी पतीचा उद्धार व्हावा.

**जिजाबाई**—शिवबा, सवाष्ण मुलगी समोर आली आणि नित्याच्या सरावानं आशीर्वाद आमच्या तोंडून निघून गेला. काळूजीचा गुन्हा मोठा आहे; पण आमचा आशीर्वादही फुकट जाऊं नये. आमच्या शब्दाचा अभिमान तुह्मांला आहेच.

**पुतळा**—महाराजांना आमचे अपराध विदित आहेत. क्षमा मागायला तोंड नाही. पोरस्वभावानं एवढ्या चुका झाल्या कीं, महाराजांच्या प्राणावर माझ्या-मुळं संकट आलं. शिद्याच्या शामियान्यांत हिरुदादाचा पराक्रम पाहिला आणि पश्चात्तापानं मन कासाविस झालं. दौलतीची सेवा थोडी तरी व्हावी अशी आई जगदंबेनं बुद्धी दिली. चकमकीच्या गर्दींत खालीं पडलेला जिरेटोप पाहिला, वैऱ्यांच्या पायदळीं तुडविला जाईल म्हणून उचलून घेतला, आणि रात्रीच्या अंधाराची आई भवानीनं पाखर घातली म्हणून आज हे पाय दिसले.

**शिवाजी**—पुतळाबाई, आईसाहेबांचा आशिर्वाद मिळाला हें तुमचं भाग्य. तुमच्या नवऱ्याचा गुन्हा फार मोठा आहे, क्षमेला तिथं वावच नाही. पोरस्वभावामुळं खरा,, पण तुम्हीं जो घोटाळा केला तो आह्मांला जियामोल महाग गेला. मराठ्यांच्या पोराबाळांनींसुद्धां दौलतीच्या जिवाला

जपलं पाहिजे तरच आमचं कार्य यशस्वी होणार. आई भवानीनं तुम्हांला वेळीच सुबुद्धी दिली. वैऱ्यापायींचं शिरस्त्राण तुम्ही जिवापाड जपून आणलं, तुमच्या कपाळाच्या कुंकवाची जोखीम आतां आमच्यावर पडली. अनाजी, काळूजी जाधवांना बंधमुक्त करून सावंताच्या वाडीला रवाना करा. दौलतीकडून या पुतळाबाईना चोळी लुगड्याचा अहेर करा आणि त्यांचीही–

**पुतळा**—नाही महाराज, कपाळचं कुंकू अढळ राहिलं तेवढंच पुरे झालं. आतां ती वाडी नको आणि शिवाजी महाराजांना वैरी लेखणाऱ्या गांवाचा वारासुद्धां नको. मी इथं आईसाहेबांच्या पायापाशी राहीन आणि त्यांच्या सेवेंतच पुढलं आयुष्य सार्थकी लावीन.

**जिजाबाई**—ठीक आहे.

**शिवाजी**—पुतळाबाई, तुम्ही आमचं शिरस्त्राण आणल्याचं तुम्हांला फळ मिळालं; पण तुमचा भाऊ हिरोजी–हिरोजींचं ऋण फिटलं नाही. हिरोजींचं आणि गजराचं गुप्तदान शिवाजीपाशींच राहिलं.

**जिजाबाई**—गुप्तदानाची फेड कधीही होत नसते शिवबा.

**शिवाजी**—खरं आहे आईसाहेब. हिंदुपदपादशाहीच्या पायीं इतकीं गुप्तदानं झाली आहेत कीं, तीं जगाला वेळीं कळणारही नाहीत. या गुप्तदानांच्या बळावरच मी करीन ती पूर्व असा अभिमान बाळगला आणि माझ्या भाऊबंदांच्या रक्तसांडीनं तो फळाला आला. मराठे वीरांच्या स्वेच्छेनं सांडलेल्या रक्ताच्या अरुणरागांतून ही दौलतीच्या यशाची पूर्व आज उजळत आहे. मराठ्यांच्या देहाचा आणि मराठ्यांच्या मुलींच्या कुंकवाचा पुरेसा खच पायांत भरल्याशिवाय हिंदुपदपादशाहीचं सिंहासन उभं राहणार नाही. मराठ्यांच्या रक्ताच्या सड्यानं वैऱ्यांचीं पापं धुवून काढलीं कीं, महाराष्ट्राच्या क्षितिजावर स्वराज्याचा सूर्य उगवेलच उगवेल. मीपणाचा अभिमान तेव्हां सोडून देईन आणि देवब्राह्मणांच्या साक्षीनं स्वराज्याची सेवा करीन. आई भवानी, तो दिवस मला अगदीं जवळ दिसत आहे; पण तो केव्हां ?

[ पडदा पडतो ]

ॐ तत्सत्

# —लोकप्रिय नाटकें—

| संगीत | रु. आ. | प्रोज ( गद्य ) | रु. आ. |
|---|---|---|---|
| एकच प्याला | १—० | करीन ती पूर्व | १—० |
| पुण्यप्रभाव | १—० | तारामंडळ | १—० |
| राजसंन्यास | १—० | तोतयाचें बंड | १—० |
| भावबंधन | १—४ | नरवीर मालुसरे | ०-१० |
| चंद्रग्रहण | १—० | प्रेमसंन्यास | १—० |
| धनुर्भंग | १—० | बेबंदशाही | १—० |
| पंतांची सून | १—० | राजाचें बंड | १—० |
| सिंहाचा छावा | १—० | खडाष्टक | ०-१२ |
| सौभद्र | १—० | नारिंगी निशाण | ०-१२ |
| कायदेभंग | १—० | लग्नमंडप | १—० |
| हास्यतरंग | ०-१२ | सिंहासन | ०-१२ |
| पुनरागमन | ०-१२ | हॅम्लेट | १—४ |
| साध्वी मिराबाई | १—० | पुरुषांचें बंड | ०-१० |

## कै. ह. ना. आपटे यांच्या कादंबऱ्या

| | | | |
|---|---|---|---|
| उषःकाल | २॥ रु. | रूपनगरची राजकन्या | १॥। रु. |
| म्हैसूरचा वाघ | १। रु. | मध्यान्ह | २ रु. |
| मधली स्थिति | २। रु. | जग हें असें आहे | २ रु. |
| स्फुट गोष्टी भाग ३ रा. | ८ आ. | स्फुट गोष्टी भाग ४ था. | ८ आ. |

## परचुरे पुराणिक आणि मंडळी,

बुकसेलर्स, माधवबाग—मुंबई नं. ४.